# नवभारत

वर्ष ६ वें ] सेप्टेंबर १९५३ [ अंक १२ वा

- नाट्यमय विशेषांक -

सुप्रसिद्ध कन्नड साहित्यिक

टी. पी. कैलासम्

यांच्या " The Purpose " या नाटकाचा अनुवाद

" प्र यो ज न "

अनुवादक : श्री. के. नारायण काळे



किंमत १ रुपया

अनुक्रमणिका










नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

## निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष सहावें — अंक बारावा

# नवभारत

सप्टेंबर १९५३

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत – श्री. हरि कृष्ण मोहनी – प्रा. वि. म. बेडेकर
का. संपादक



☞ अशुद्धाची दुरुस्ती – पान ४ वर शेवटच्या ओळींत ' र शं. मुगळि ' ऐवजीं ' रं. श्री. मुगळि ' असें वाचावें.

वार्षिक रु. ९ — सहामाही रु. ५ — अंकास रु. १

हें मासिक र. ग. जोशी यांनीं सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापून सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

अनुक्रमणिका








# 'नवभारत', सेप्टेंबर १९५३

## — लेखक-परिचय —

**प्रा. रं. श्री. मुगाळि**—सांगली येथील विलिंग्डन कॉलेजमध्यें प्राध्यापक. यांनीं कन्नड भाषेंत कादंबऱ्या, कविता, नाटकें लिहिलीं असून कर्नाटक संस्कृतीविषयीं एक इंग्रजींत ग्रंथहि लिहिला आहे.

**प्रा. वि. कृ. गोकाक**—धारवाड येथील कर्नाटक कॉलेजचे प्राचार्य. कानडींतील प्रसिद्ध कवि आणि चतुरस्र लेखक.

**प्रा. द. रा. बेन्द्रे**—सोलापूर येथील डी. ए. व्ही. कॉलेजमध्यें प्राध्यापक. सुप्रसिद्ध कन्नड कवि; " कन्नड कवितिलक ".

**श्री. मास्ती वेंकटेश अय्यंगार**—( बंगलोर ) एक अग्रगण्य कन्नड साहित्यिक. यांचा सविस्तर परिचय यापूर्वीं 'नवभारता'च्या एप्रिल १९५३ च्या अंकांत श्री. गौरीश कैकिणी यांनीं करून दिला असून, त्याच अंकांत त्यांची सुप्रसिद्ध 'गौतमीची गोष्ट' हि दिली आहे.

**श्री. हरीन्द्रनाथ चट्टोपाध्याय**—सुप्रसिद्ध कवि आणि लेखक.

**श्री. के. नारायण काळे**—बी. ए. (ऑ.), एल्. एल्. बी. – ( पुणें ) – सुप्रसिद्ध नाट्य-चित्रपट-दिग्दर्शक, पटकथा-लेखक. 'सहकारमंजरी' ( १९३२ ) या कविता-संग्रहाचे लेखक.

---

## 'नवभारत' मासिकाचा बदललेला पत्ता

**येत्या ऑक्टोबर १९५३ अंकापासून 'नवभारत'** मासिक **वांई** येथील '**प्राज्ञ प्रेस**'मध्यें छापलें जाणार आहे. व्यवस्थापकांच्या सोयीच्या दृष्टीनें 'नवभारता'च्या व्यवस्थापकांची कचेरी **वांई** येथेंच सप्टेंबर १५ पासून नेण्यांत येईल. म्हणून यापुढें वर्गणीदार, एजंट वगैरे यांनीं व्यवस्थापकांशीं पत्रव्यवहार करावयाचा झाल्यास तो व्यवस्थापक : 'नवभारत' मासिक **c/o प्राज्ञ प्रेस, वांई, जि. उ. सातारा.** या पत्त्यावर करावा.

'नवभारता'च्या **संपादकांची कचेरी पुणें येथेंच राहील.** संपादकांशीं पत्रव्यवहार "**वि. म. वेडेकर, कार्यकारी संपादक, 'नवभारत', ९०६ शिवाजीनगर, पुणें ४**" या पत्त्यावर करावा.

—०—

अनुक्रमणिका








## संपादकीय

# आभार—आणि विनंति

पूर्वी जाहीर केल्याप्रमाणें प्रस्तुत सप्टेंबरचा हा नाट्यमय विशेषांक वाचकांना आनंदानें सादर करीत आहोंत. प्रस्तुत अंकांत **श्री. टी. पी. कैलासम्** यांच्या 'Purpose' या समग्र नाटकाचा '**प्रयोजन**' या शीर्षकाखालीं श्री. के. नारायण काळे यांनीं केलेला अनुवाद समग्र दिला आहे. कांहीं दिवसांपूर्वीं श्री. के. नारायण काळे यांनीं हस्तलिखित स्वरूपांतील हें अनुवादित 'प्रयोजन' कांहीं श्रोत्यांसमोर वाचून दाखविलें. तें अत्यंत परिणामकारक होऊन श्रोत्यांना आवडलें याची ग्वाही प्रा. मंगरूळकरांसारख्या विद्वान् विवेचक श्रोत्यांनीं दिलेली 'साधना' साप्ताहिकांतून पूर्वी प्रसिद्ध झालेली आहे. आतां तो अनुवाद प्रत्यक्ष वाचकांपुढें आहे. प्रस्तुत अनुवादरूपानें मराठी नाट्यवाङ्मयांत एक अत्यंत मोलाची आणि वैशिष्ट्यपूर्ण भर पडली आहे, असें वाचकांस खचित वाटेल.

याच अंकांत प्रस्तुत '**प्रयोजन**' नाटकाबरोबरच, मूळ नाटककार टी. पी. कैलासम् यांचें चरित्र, व्यक्तिमत्त्व, त्यांच्या प्रतिभासृष्टीचें वैशिष्ट्य, 'प्रयोजन' नाटकाचें समीक्षण यांसंबंधीं कांहीं लेख दिले आहेत, ते वाचकांस अत्यंत उद्बोधक व औचित्यपूर्ण वाटतील. या लेखांचे लेखक कन्नड साहित्यसृष्टींत अत्यंत थोर गणले गेलेले विद्वान् साहित्यिक आहेत ही गोष्ट लक्षांत घेतल्यास, या लेखांना विशेषच मोल असल्याचें प्रत्ययास येईल. कलावंताची एक प्रत्यक्ष उत्तम कलाकृति व तीबरोबरच त्या कलाकाराच्या चरित्र-वाङ्मय-व्यक्तिमत्त्वाचें मार्मिक दर्शन—हा योग मोठा आनंददायक असून त्या योगें हा 'नवभारता'चा अंक एक छोटासा कैलासम्-विशेषांकच झाला आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. कैलासम् यांच्यासंबंधीं प्रत्यक्ष कन्नड नियतकालिकसृष्टींतहि असा 'कैलासम् विशेषांक' अजून निघालला नाहीं, असें तज्ज्ञांच्या माहितीवरून कळतें. म्हणून हा प्रस्तुत छोटा 'कैलासम्-विशेषांक' काढून 'नवभारता'नें एक अपूर्वाई साधली आहे, याचा आनंद वाटतो. आपल्या भारतीय साहित्य-विश्वांत, विशेष म्हणजे आपल्या शेजारींच रहात असलेल्या कन्नड भाषाभगिनीच्या साहित्यविश्वांत आपल्या अतुल तेजानें तळपणारा एक महान् तारा मराठी वाचकांच्या दृष्टिपथांत आणून दिल्याचें अल्पसें श्रेय 'नवभारता'स मिळालें, तर या विशेषांकाच्या अपूर्व उपक्रमाचें सार्थक झाल्या-सारखें वाटेल.

प्रस्तुत नाट्यमय 'कैलासम्-विशेषांक' सिद्ध करण्यांत अनेकांचें हार्दिक सहकार्य लाभलें आहे : श्री. के. नारायण काळे यांनीं हा आपला सरस अनुवाद 'नवभारतां'त प्रसिद्ध करावयास दिला. कैलासम् यांच्या कन्या सौ. लक्ष्मी गणनाथन् यांनीं कैलासम् यांच्या 'The Purpose' या नाटकाचा मराठी अनुवाद प्रसिद्ध करण्यास आनंदानें अनुज्ञा दिली. कैलासम् यांचें चरित्र, वाङ्मय, व्यक्तिमत्त्व, त्यांच्या प्रतिभेचें वैशिष्ट्य यांचें विवेचन व समीक्षा करणारें लेखसाहित्य श्री. मास्ती वेंकटेश अय्यंगार, प्रा. द. रा. बेन्द्रे, प्रा. वि. कृ. गोकाक, प्रा. रं. श्री. मुगाळि यांनीं पाठविलें. कै. कैलासम् यांचे एकनिष्ठ अंतेवासी श्री. बी. एस्. रामराव यांनीं मोठ्या आपुलकीनें आपल्याजवळ असलेलें साहित्य—सर सी. आर. रेड्डी यांचें एकलव्यावरील टिपण, हरीन्द्रनाथ चट्टोपाध्याय यांच्या कैलासम्विषयींच्या आठवणी, कैलासम् यांच्या हातचें एक पत्र इत्यादि—'नवभारता'ला उपलब्ध करून दिलें. पुणें येथील इंटरनॅशनल बुक सर्व्हिसचे श्री. विठ्ठलराव दीक्षित यांनींहि आपल्याजवळचें कैलासम् यांचें साहित्य उपलब्ध करून देऊन हर प्रकारें उत्साहानें साहाय्य केलें. पुणें येथील कर्नाटकसंघाचे चिटणीस श्री. बडगुंडी यांनीं आपल्या संघाजवळ असलेल्या कैलासम् यांच्या फोटोचा प्रस्तुत अंकांतील छाया-चित्राकरितां उपयोग करूं दिला.—या नामनिर्देश केलेल्या सर्वांनीं व इतरांनींहि 'नवभारता'शीं सहकार्य करून या विशेषांकाला वैशिष्ट्य प्राप्त








करून देण्यांत जें साहाय्य केलें आहे त्याबद्दल त्यांचे आम्ही अत्यंत आभारी आहोंत.

प्रस्तुत सेप्टेंबरचा अंक 'नवभारता'च्या सहाव्या वर्षाचा बारावा अंक आहे. ऑक्टोबर-पासून 'नवभारता'चें सातवें वर्ष सुरू होईल. या संपणाऱ्या वर्षीं 'नवभारतां'त आलेल्या लेखांची व लेखकांची सूची याच अंकांत दिली आहे. तीवरून 'नवभारता'नें प्रसिद्ध केलेल्या वैशिष्ट्य-पूर्ण व वैविध्यपूर्ण वाङ्मयाची कल्पना येईल. गेल्या पांच वर्षांप्रमाणेंच या सहाव्या वर्षींहि राजकारण, अर्थकारण, समाजकारण, वाङ्मय, तत्त्वज्ञान, विज्ञान इत्यादि विविध क्षेत्रांतील विषयांवर तज्ज्ञांनीं अभ्यासपूर्वक लिहिलेले लेख प्रसिद्ध झालेले आहेत. हे लेख केवळ तात्त्विक नसून, वर्तमान जगांतील प्रचलित घडामोडींच्या व वैचारिक खळबळीच्या अनुषंगानें व अनुसंधानानें उत्पन्न होणाऱ्या प्रश्नांवर लिहिलेले म्हणून ताजे अद्ययावत् आहेत, असें दिसून येईल. या वैशिष्ट्या-बरोबरच 'नवभारता'चें आणखी एक ठळक वैशिष्ट्य म्हणजे 'नवभारता'ची निःपक्ष, व्यापक भूमिका हें होय. लेखक व त्यांच्या लेखांतून व्यक्त झालेले विचार यांवरून 'नवभारता'च्या या निःपक्ष, पक्षातीत, व्यापक भूमिकेची साक्ष पटण्यासारखी आहे.

'नवभारत' गेलीं सहा वर्षें जी वैशिष्ट्यपूर्ण वाङ्मयीन सेवा करीत आलें आहे, ती करतांना ज्या विद्वान्, चिकित्सक आणि स्नेहशील लेखकांचें, वाचकांचें आणि हितचिंतकांचें सहानुभूतिपूर्ण सहकार्य लाभलें आहे, त्यांचे आम्ही अत्यंत ऋणी आहोंत. हा ऋणनिर्देश करतांना आनंद होत असला, तरी त्याबरोबरच 'नवभारता'च्या चालकांचें 'नवभारत' कार्यक्षम रीतीनें चालवा-वयाचें आर्थिक सामर्थ्य वाढलें नाहीं, हें नमूद करण्यास वाईट वाटतें. चालकांच्या आर्थिक सामर्थ्यावरील हा ताण जर लवकर कमी झाला नाहीं, तर 'नवभारत' पुढें चालू ठेवणें चालकांस कठिण जाईल. मराठी नियतकालिकसृष्टींत 'नवभारता'नें जें एक वैशिष्ट्यपूर्ण स्थान मिळविलें आहे तें कायम रहावें, 'नवभारता'सारखा हा निःपक्ष प्रयत्न सुस्थिर व अधिकाधिक कार्यक्षम चालू रहावा, असें अनेकांनीं आपलें मत व्यक्त केलें असून, असेंच मत 'नवभारता'च्या सर्व वाचकांचें असावें असा विश्वास वाटतो. याच विश्वासाच्या बळावर, 'नवभारता'च्या वाचकांच्या उदार बुद्धीला आवाहन करावयाचें व प्रतिकूल परिस्थितीस तोंड देऊन 'नवभारत' पुढें चालू ठेवावयाचें योजिलें आहे.—म्हणून 'नवभारता'चे वाचक, लेखक, हितचिंतक या सर्वांना आमची अशी कळकळीची प्रार्थना आहे कीं, 'नवभारता'स सुस्थिरता प्राप्त करून देण्याच्या दृष्टीनें त्यांनीं 'नवभारता'स आर्थिक साहाय्य मिळवून देण्याच्या कामीं मनःपूर्वक सहकार्य करावें, आपल्या ओळखीच्या ऐपतदार व्यक्ती, शिक्षणसंस्था, वाचनालयें यांच्या नजरेस 'नवभारत' आणून त्यांच्यामधून 'नवभारता'ला वर्गणीदार, देणगी-दार मिळवून द्यावे.

ऑक्टोबरचा अंक नेहमींप्रमाणें वाचकांच्याकडे वेळेवर येईल.

'नवभारता'च्या अगदीं आरंभापासून आतां-पर्यंत गेलीं सहा वर्षें 'नवभारता'च्या छपाईचें काम सु. रा. ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाच्या सुलभ मुद्रणालयांत होत आलें आहे. सुलभ मुद्रणालयाचे व्यवस्थापक श्री. रा. ना. सरनाईक व त्यांचे सहकारी यांनीं गेलीं सहा वर्षें सतत, अखंडपणें 'नवभारता'चें छपाईचें काम अगदीं वक्तशीर, व्यवस्थित, चोख करून दिलें याबद्दल त्यांचे मनःपूर्वक आभार मानतों.

**वि. म. बेडेकर,**
कार्यकारी संपादक

**— 'नवभारत' मासिकाचा बदललेला पत्ता —**

**व्यवस्थापक :—'नवभारत' मासिक c/o प्राज्ञ प्रेस, वाई, जि. उ. सातारा.**

**कार्यकारी संपादक :—'नवभारत' मासिक, ९०६ शिवाजीनगर, पुणें ४.**

कैलासम् यांच्या व्यक्तिमत्त्वाचें ओझरतें दर्शन : प्रा. रं. श्री. मुगळि

# त्यागराज परमशिव कैलासम्

## ' टिपिकल ॲस ' !

आधुनिक भारतीय साहित्यिकांमध्यें श्रेष्ठ प्रतीचे प्रतिभावन्त असें ज्यांना म्हणतां येईल त्यांपैकीं **कैलासम्** हे एक होऊन गेले. त्यांचें सबंध नांव **त्यागराज परमशिव कैलासम्** असें होतें. इंग्रजींत 'टी. पी. कैलासम् ' असें लोक त्यांना म्हणत होते. तें ऐकून ' टिपिकल ॲसम् ( typical ass-am ) ' ( ' नमुनेदार गाढव ' ) म्हणून कैलासम् हे स्वतःच कोटी करून स्वतः हंसत आणि लोकांना हंसवीत असत ! स्वतःच्या चेष्टेपासून लोकांच्या चेष्टेपर्यंत अनिर्बंधपणें विहार करणारी तरल अशी बुद्धिमत्ता आणि प्रतिभा म्हणजेच कैलासम् होत. ' गाढवासारखा हा विक्षिप्त कैलासम् आहे ' असें जें कैलासम् स्वतःविषयीं म्हणत त्यांत नुसती शब्दा-वर कोटी नसून तें खरोखरीं त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचें साभिप्राय प्रतीक आहे. लोकव्यवहाराच्या दृष्टीनें निरुपयोगी आणि अनाकर्षक असा हा प्राणी जीवनाचें सारें सुखदुःखाचें ओझें आपल्या पाठीवर घेऊन ' हें बघा ' म्हणून ओरडत हिंडत होता ! म्हणूनच ' हा विक्षिप्त गाढव आहे ' असा अभिप्राय विजेच्या वेगानें स्फुरलेल्या त्या कोटींत एकवटून दिसून आला !

कैलासम् यांचें जीवन अथपासून इतीपर्यंत वक्रविलासानें कडाडणाऱ्या विद्युल्लतेसारखें चमकत होतें. एका अर्थानें त्यांना जन्मजात कवि ( born poet ) असें म्हणतां येत नाहीं. असामान्य प्रतिभा असूनसुद्धां वयाच्या तारुण्यदशेपर्यंत ती अजीबात झांकूनच राहिलेली होती. तोंपर्यंत ते उत्तम नाटक-कार किंवा कवि होतील अशी कोणाला कल्पनाहि आली नव्हती. परंतु पुढें त्यांना मिळालेला अनुभव आणि त्यांतून घडलेले संस्कार यांच्या जणूं मेघमंडलामधून त्यांची प्रतिभा अचानकपणें बाहेर आली !

## शिक्षण व संस्कार

कैलासम् यांचा जन्म १८८५ सालीं बेंगळूरमध्यें एका विद्वान् , सुसंस्कृत अशा कुटुंबांत झाला. त्यांची आई जुन्या पद्धतीची परमसाध्वी होती. त्यांचे वडील श्री. परमशिव अय्यर हे म्हैसूर संस्थानांत मोठे अधिकारी होते. ते अत्यंत शिस्तप्रिय स्वभावाचे म्हणून प्रसिद्ध होते. मद्रास हायकोर्ट जज्ज म्हणून नांवाजलेले श्री. सदाशिव अय्यर हे कैलासम् यांचे चुलते होते. दोघांच्याहि विद्वत्तेचा प्रभाव कैलासम् यांच्यावर पडला. त्यांतल्या त्यांत उग्र स्वभावाच्या वडिलांपेक्षां सौम्य प्रकृतीच्या चुलत्यांचा प्रभाव अधिक पडला. कैलासम् यांच्या घरची भाषा तमिळ असली तरी आजूबाजूची परिसराची भाषा कानडी होती. कैलासम् यांचें शालेय शिक्षण कानडींतून झालें. पुढें मद्रास प्रेसिडेन्सी कॉलेजमधून भूगर्भशास्त्र हा विषय घेऊन ते बी. ए. परीक्षा उत्तीर्ण झाले.

कॉलेजमध्यें असतांना अभ्यासापेक्षां खेळांकडे, विनोदाकडे त्यांचें लक्ष जास्त होतें. फुटबॉलमध्यें गोलकीपर म्हणून त्यांची फार ख्याति होती. पुढच्या व्यासंगाकरितां ते इंग्लंडला जाऊन लंडनच्या ' रॉयल कॉलेज ऑफ सायन्स ' या संस्थेंत प्रवेश मिळवून ६ - ७ वर्षें तिकडे राहिले. त्यांच्या नंतरच्या साहित्यिक जीवनाच्या दृष्टीनें त्यांचीं लंडनमधलीं हीं वर्षें अत्यंत फलप्रद झालीं असें म्हणायला हरकत नाहीं. तेथें आपल्या आवडत्या भूगर्भशास्त्रविषयाचा त्यांचा अभ्यास चालूच होता. पण लंडनसारख्या जागतिक महत्त्वाच्या राजधानींत भूमीच्या अंतरंग-परिचयाबरोबर भूमिपृष्ठावरील प्रचलित राजकीय

आणि कलाविषयक आंदोलनांचाहि साद्यंत परिचय ते करून घेत होते! लंडनमध्यें राहत असतांना वर्षाच्या ३६५ दिवसांपेक्षां साधारण ३५० दिवस तरी संध्याकाळीं कैलासम् हे तेथील नाटकमंदिरांत जात होते, निरनिराळीं नाटकें पाहात होते. इंग्रजी भाषा मातृभाषेपेक्षांहि त्यांना उत्तम अवगत झाली. खुद्द लंडनमधील खास शहरी (cockney) बारीकसारीक प्रभेद तर त्यांना सहज साधले.

## पहिलें आणि पहिल्या प्रतीचें नाटक

इंग्लंडहून ते अत्यंत विशाल आणि गाढ संस्कार घेऊन परतले. येथें आल्यावर भूगर्भ-शास्त्राच्या खात्यांत त्यांना एक चांगली नोकरीहि मिळाली. परंतु त्यांच्या मनोगर्भामध्यें जी खळबळ चालली होती तिचा कोणालाहि पत्ता लागला नाहीं! स्नेह्यांमध्यें असतांना सारखे हास्यविनोद, गाणें आणि मजा यांत ते मग्न असत. इंग्लिश गाणीं म्हणून दाखवावयाची त्यांना फार आवड. त्यांच्या गोष्टी, चेष्टा यांनीं मोहून जाऊन तरुण मंडळी सदोदित त्यांच्या पाठीमागें जात होती. नौकरी करीत असतांना कैलासम् बंगळूरच्या हौसी नाटकमंडळीचे सदस्य झाले. पहिल्यांदा शेक्स्पिअरच्या 'ऑथेल्लो' नाटकांत त्यांनीं एक भूमिका केली. पुढें त्या नाटकमंडळीजवळ रंगभूमीवर आणायला नवीन कानडी नाटक नाहीं असें बघून मंडळीच्यातर्फें एक नाट्यलेखनस्पर्धा ठेवण्यांत आली. त्या स्पर्धेसाठीं कैलासम् यांनीं आपलें थोड्या दिवसांपूर्वी लिहिलेलें 'टोळ्ळुगट्टि' ('पोकळ आणि घट्ट' 'hollow and solid') हें पहिलें नाटक पाठविलें. त्या नाटकाला पारितोषिक मिळालें आणि रंगभूमीवर त्याचा प्रयोग यशस्वी झाला, इतकेंच नव्हे तर कलादृष्टीनें उत्तम ठरलेलें पहिलें सामाजिक नाटक म्हणून तें प्रसिद्ध झालें.

## गृहत्याग

अशा रीतीनें कैलासम् यांनीं साहित्यक्षेत्रांत आणि रंगभूमीवर अचानकपणें प्रवेश केला आणि कन्नड नाटकविश्वांत नवीन युगच सुरू केलें. हळूहळू ते त्यांत इतके रंगून गेले कीं, या प्रतिभेच्या हांकेपुढें नौकरींत त्यांना मजा वाटली नाहीं. नौकरी त्यांनीं सोडून दिली. घरीं त्यांचें पटेनासें झालें. यामुळें आणि त्यांच्या एकंदर लहरीपणामुळें घरांतील सामरस्य कमी झालें. त्यांचें जीवनच बदललें. मर्यादित स्वार्थाचा त्याग करून ते विशाल प्रपंचाचे साक्षी आणि उद्गाते बनले. बेंगळूरमध्यें आपल्या वडिलांच्या 'श्वेतगृह' नांवाच्या घरीं एका बहुशः घाण झालेल्या खोलींत वाटेल तेवढी चहा-कॉफी पीत, सिगरेट ओढीत, रात्रभर वाचीत-लिहीत, दिवसा इकडे तिकडे हिंडत हा प्रतिभापुत्र राहत होता! इतकें असूनसुद्धां त्यांची प्रकृति बिघडली नाहीं. तरुणपणीं व्यायाम करून त्यांनीं शरीरसंपत्ति चांगली कमावून ठेवली होती. ते बेंगळूर सोडून बाहेरगांवीं गेले म्हणजे ज्या मित्रांच्या घरीं राहत तेच खरोखर त्यांना आपलें घर असें वाटे इतक्या आत्मीयतेनें ते वागत असत.

## उत्कट मानवता

कैलासम् यांच्या ठिकाणीं तेजस्वी बुद्धिमत्ता आणि शीघ्रसुलभ वाक्पटुता होती. पण या गुणांपेक्षांहि विशेष म्हणजे त्यांच्यामध्यें अत्यंत उत्कट मानवता होती. मानवी सुखदुःखें आणि मानवी समस्या यांची खोल जाणीव व त्यांबद्दलची तीव्र सहानुभूति त्यांच्यामध्यें प्रतिक्षणीं दिसत होती. व्यक्तीमध्यें बुद्धिमत्ता आणि प्रतिभा ह्या श्रेष्ठ दर्जाच्या असूनहि मानवतेची उत्कट आणि सहज भावना नसेल तर त्या व्यक्तीचें जीवन आणि कला दोन्ही, स्वतःला व जगाला, शापच ठरण्याचा संभव असतो! सुदैवानें कैलासम् यांच्या ठिकाणीं ही गाढ मानवता होती. त्यांच्या समग्र कलानिर्माणाच्या मुळाशीं ही मानवतेची बुद्धि आहे म्हणूनच त्यांना साफल्य मिळालें. त्यांच्यामध्यें प्रेमळता आणि नम्रता हे दोन गुण ठळकपणें उठून दिसत. आपली प्रतिभासृष्टि किती उच्च कोटीची असली तरी तिची स्तुति त्यांना आवडत नव्हती. आपल्यापेक्षां इतरांच्या प्रतिभेच्या उच्च शिखरांकडे ते सारखे बोट दाखवीत. नवीन तरुण लेखकांनीं लिहिलेली कविता असली तरी ती मन लावून ऐकावयाची आणि आपली प्रतिक्रिया काय असेल ती कळवावयाची अशी त्यांची पद्धत होती.

कैलासम् हे बहुतेक सगळ्याच प्रतिभावंतांप्रमाणें आपल्या स्वतःसंबंधीं बेफिकीर होते. लोकजीवनाचें देशकालातीत दर्शन घेऊन मानवजातीच्या भवि-










# त्यागराज परमशिव कैलासम्

तब्याची काळजी करणारे हे महाभाग स्वतःविषयींच्या निष्काळजीपणाचे मूर्तिमंत अवतारच होते! खाण्यापिण्यासंबंधीं कांहींच नियमनिर्बंध नव्हता. सिगरेट् तर सारखी त्यांच्या तोंडांत असायचीच. हातांत पैसे असले तर ते सर्व वाटेल तसे खर्च व्हायचे. कांहीं वेळां पैशासाठीं आपलें नाटक-वाचन, विनोद-गायन इत्यादि मनोरंजनाचा कार्यक्रम ते घडवून आणीत. त्यांची पंजाबमेलच्या वेगानें धांवणारी वाणी श्रोत्यांना कांहीं वेळां समजत नसे. त्यामुळें पैसे देऊनसुद्धां श्रोत्यांच्या पदरीं निराशाच पडत असे. 'हा कुठला तरी विदूषक आहे, मोठा प्रतिभावंत म्हणून उगीच लोक म्हणतात' असा गैरसमज कांहींच्या मनांत निर्माण होत असे. कैलासम् यांच्या व्यक्तिमत्त्वांत पुष्कळ अतिरेकीपणा होता, दोषदौर्बल्यें होतीं. पण त्यांच्याशीं ज्यांचा अत्यंत निकट संबंध आला त्या सगळ्यांना त्यांच्या आदरणीय, आश्चर्यकारक आणि गूढरम्य व्यक्तित्वाचा साक्षात्कार झाल्याविना राहत नसे.

कैलासम् यांची प्रतिभा कांहीं विशेष स्वरूपाची होती असें म्हणायला हरकत नाहीं. पूर्वी सांगितल्याप्रमाणें ते साहित्यिक होतील असा आयुष्याच्या एका अवस्थेपर्यंत कोणालाहि सुगावा लागला नव्हता. ते इंग्लंडमध्यें असतांना तेथील कलाजीवन बघून व वाङ्मय वाचून त्यांची गुप्त सरस्वती आंतल्या आंत जागृत झाली आणि मायदेशीं परत आल्यावर येथील परिस्थितीचें आवाहन मिळाल्याबरोबर ती एकदम प्रकट झाली. 'The wind bloweth when it listeth' या वचनाप्रमाणें जणूं एका क्षणार्धात कैलासम् यांच्या अंतरंगांत झंझावातासारखी कुठून तरी येऊन प्रतिभा प्रकट झाली आणि शेवटपर्यंत ती अत्यंत प्रसन्न आणि जोरदार अशी राहिली!

## त्यांचें मन हें प्रतिभेचें नेपथ्यगृह

कैलासम् यांनीं पुष्कळ लहान-मोठीं नाटकें लिहिलीं. त्यांतील बहुसंख्य कानडींत आहेत. बाकीचीं नाटकें इंग्रजींत आहेत. पण एक गोष्ट लक्षांत ठेवायला पाहिजे कीं, त्यांनीं आपण होऊन स्वतः नाटकें लिहिलीं असें म्हणणें चुकीचें होईल. बहुतेक सगळीं नाटकें त्यांच्या बोलण्याच्या ओघामध्यें निर्माण झालीं. कोणाशीं तरी बोलतांना कुठली तरी सामाजिक समस्या किंवा रामायण-महाभारतांतील प्रसंग यांची आठवण निघाली कीं, ज्याप्रमाणें वेषभूषा घालून तयार झालेले नट द्रुतगतीनें रंगभूमीवर येऊन अभिनय सुरू करतात, त्याप्रमाणें कैलासम् हे नवीन नाटकाचा तेथल्या तेथें साभिनय प्रयोग करूनच दाखवीत. त्यांची ही शक्ति असाधारण होती. अर्थात् मागाहून ते नाटकांत थोडी दुरुस्ती करीत. एखादें नाटक किंवा त्याचा थोडा भाग त्यांनीं बसून लिहिला नाहीं असें नाहीं. पण तें अपवादादाखलच. जणूं काय त्यांचें मन म्हणजे प्रतिभेचें नेपथ्यगृह आहे आणि तेथून जणूं नटूनसजून नाट्यप्रसंग, पात्रें, संवाद, सगळीं बाहेर येत आहेत असें वाटे.

त्यांचीं सगळीं कानडी नाटकें प्रचलित सामाजिक विषयांवर असून तीं लोकांच्या नेहमींच्या व्यवहाराच्या भाषेंत आहेत. कांहीं नाटकांमध्यें इंग्रजीचें मिश्रण फार झालें आहे. त्यांनीं इंग्रजींतून रचिलेलीं नाटकें मात्र पौराणिक विषयावर असून प्रौढ आणि गंभीर आहेत. त्यांचा विनोद, वक्रोक्ति हीं सगळीं कानडी नाटकांतच आढळून येतात. त्यांनीं निर्माण केलेल्या पात्रांमध्यें सजीवता आहे, विशिष्टता आहे. नाटककाराच्या व्यक्तिनिरपेक्ष साक्षिभावानें लोकजीवन पाहून त्यांनीं तीं पात्रें रंगविलीं असलीं, तरी त्या पात्रांच्या भाषणांतून वक्रोक्ति आणि विदग्धता हीं इतकीं भरून राहिलीं आहेत कीं, त्यामुळें 'कैलासमिझम्' किंवा कैलासम् यांची विशिष्ट एकमेव छाप सर्वत्र व्यापून राहिली आहे असें दिसतें. त्यांची तरल बुद्धिमत्ता आणि कोटीबाजपणाहि त्यांच्या कांहीं पात्रांत येऊन एक प्रकारची अस्वाभाविकता निर्माण होते, हें खरें. पण ज्या नाटकांतील व्यक्ती कैलासम्सारख्याच बव्हंशीं असतात तेथें ही विसंगति फार उठून दिसत नाहीं.

**त्यागराज परमशिव कैलासम्** हे आपल्या नांवाला साजेसे असे **त्यागराज** झाले. मानवजातीच्या **परमशिवाला** त्यांनीं आपलें जीवन व कला हीं वाहून घेतलीं आणि आपल्या कलाकृतींतून सौंदर्याचा **कैलास** गांठून अमर झाले.

जन्म : २९ जुलै १८८५ ] त्यागराज परमशिव कैलासम् [ मृत्यु : २३ नोव्हें. १९४६

# यांचें
# प्रकाशित वाङ्मय

## कानडी : नाटकें

१ टोळ्ळुगट्टि ( पोकळ आणि घट्ट ) : भाग १
२ पोलिंकिट्टि ( उडाणटप्पू किट्टी ) : भाग १ व २
३ बहिष्कार
४ होंरूलु ( स्वगृहराज्य )
५ गंडस्कत्री ( पुरुष–कात्री )
६ वैद्यन जाड्य ( वैद्याचे आजार )
७ टोळ्ळुगट्टि ( पोकळ आणि घट्ट ) : भाग २
८ हुत्तदल्लिहुत्त ( चक्रांतलीं चक्रें – Wheels within Wheels )
९ वण्डवाळविल्लद वडायि ( भांडवलाशिवाय वढाई )
१० अम्माब्रगण्ड ( बाईचा यजमान )
११ सीकर्णे सावित्री ( सीकरणाची सावित्री )
१२ सत्तवन संताप ( मेलेल्या माणसाचा संताप )
१३ अनुकूलक्को व्वण्ण ( अनुकूलासाठीं एक भाऊ )
१४ नम्म कंप्नि ( आमची कंपनी )
१५ नम्म क्लब्बु ( आमचे क्लब )
१६ नम्म ब्राह्मणिके ( आमचें ब्राह्मण्य )
१७ अप्टुडेट मव्य ( अप्टुडेट बाई )
१८ सूळे ( वेश्या )

## कानडी : कथा

१ तावरकेरे ( कमलसरोवर )

## कानडी : कविता

१ तिप्पारळी ( तिप्पारगांव )
२ कोळीकगुंग ( अंकित नाम )

## इंग्रजीं : नाटकें व कविता

1 Purpose ( Drama )
2 Little Lays and Plays ( Poetry and Drama )
3 The Fulfilment ( Drama )
4 The Brahmin's Curse ( Karna ) — ( Drama )
5 Keechaka ( Drama )

✫ यांशिवाय कैलासम् यांच्या अप्रकाशित अशा वाङ्मयकृती कानडींत लिहिलेल्या सुमारें ३० व इंग्रजींत लिहिलेल्या सुमारें १३ - १४ आहेत.

— र. शं. मुगळि

प्रा. वि. कृ. गोकाक : अनु. श्री. वि. म. वेडेकर

# कैलासम् : कर्नाटकाचा साक्षी नाट्याचार्य

— १ —

तुझ्यावर नियतीनें आपले निर्दय बाण सारखे रोंखून ठेवले होते. नियतीच्या बाणांचें जसें तूं निशाण होतास तसें त्यांचें तूं शाणहि ( धार लावायचा दगड ) होतास. ( तुझ्यावर नियतीचे बाण येऊन पडत पण तुझ्या संघर्षानें ते अधिक पाजळून निघत ).

सुखसमृद्धीच्या मांडीवर तूं वाढलास. लक्ष्मीच तुझा पाळणा हलवीत होती. पण आज तुला सबंध देशभर पायपीट करीत वणवण हिंडावें लागत आहे ! ईश्वरानें तुला प्रतिभेची आणि कवित्वशक्तीची अद्भुत देणगी दिली. पण त्या दिव्य देणगीवर नियतीनें कांहीं काळ आपला पडदा टाकला व तिचें तेज झांकून टाकलें. अनंत काळाच्या उदरांत ठाव घेणारी तुझी दिव्य दृष्टि. पण दुर्दैव असें कीं, भूमीच्या उदरांत धडपडण्याकरितां तुला श्वेतद्वीपाला पाठविलें. स्वतःचेच डोळे फोडून घेतलेल्या आंधळ्याची भूमिका करण्याचें तुझ्यावर येऊन पडलें.

पण शेवटीं तूं मनाचा निश्चय केलास. आपल्या जीवनाच्या भौतिक वैभवावर तूं पडदा टाकलास. आपल्या अंगावरील वेषभूषणें फेंकून दिलींस. जीवनाच्या नाटकांतील विविध बारीकसारीक प्रवेशांतील एखादें पात्र बनण्याऐवजीं तूं जीवनाच्या नाटकांतील एक साक्षी, एक श्रोता, एक प्रेक्षक होऊन, त्यांत रमून गेलास. नाट्यगृहांत जाऊन रंगभूमीचें दर्शन घेतलेंस, पुष्कळ नाटकें बघितलींस. त्यामुळें तुझ्या आत्म्याची भूक जी तुलाच खाऊन टाकीत होती–ती किंचित् शमली व तुझें मन किंचित् रमलें.

भूगर्भशास्त्रज्ञ म्हणून तूं घरीं परत आलास. इतरांप्रमाणें लठ्ठ पगाराची नौकरी धरुन तूं राहावेंस, असें लोक म्हणत होते. कांहीं थोडे महिने अधिकाराचीं वेषभूषणेंहि तूं परिधान केलींस. पण लगेच तुला त्यांचा वीट येऊन तूं तीं भिरकावून दिलींस. ‘ इतरांसारखा मी नाहीं. काय म्हणून मीं इतरांसारखें जगावें ? ’ असें म्हणत गतानुगतिक प्रवाहांतून तूं बाहेर पडलास व अंग झाडून मोकळा झालास !

घरावर तुझें प्रेम होतें खरें. पण घराच्या चार भिंतींच्या आड तुझें मन रमेना. तूं अनिकेत झालास. माणसानें नुसतें जगायचें म्हटलें तरी नुसतें जगण्या-करितां देखील किती भयंकर सत्त्वहरण त्याचें जग करीत असतें ! या गोष्टीची तुला भयंकर चीड आली ! तुझ्या अंतरात्म्याच्या अगदीं खोल गाभाऱ्यांतून आंतून एक वेणुध्वनि सारखा येत होता. त्या गुंजारवानें तुला वेड लावलें होतें. तो

---

प्रा. वि. कृ. गोकाक यांनीं **कैलासम्** यांच्यावर ‘ **साक्षिक** ’ नांवाची एक कविता कन्नडमधून **लिहिली आहे.** तिचा इंग्रजी गद्य-अनुवाद त्यांनीं स्वतःच ‘ Kailasam, the Playwright-Witness of Karnatak ’ या शीर्षकाखालीं केला आहे. त्याचाच अनुवाद येथें सादर केला आहे —अनुवादक.











तुझ्या कानाशीं सारखा गुणगुणत होता : " ऐक, माझें ऐक, माझ्यावर विश्वास ठेव. "

आणि प्रलयंकर स्मशानवासी रुद्राप्रमाणें तूं सर्व मायापाश वाऱ्यावर भिरकावून दिलेस आणि प्रपंचावर, संसारांतील कौटुंबिक सुखदु:खांवर निखारा ठेवलास ! जगांतील सर्व रमणीयता आणि सूक्ष्मता, सर्व आनंद आणि यातना यांच्या संचाराकरितां आपलें अंतरंग सताड उघडें करून ठेवलेंस. हातांत जळती सिगारेट; जवळ पिण्याकरितां आंबट ताकाचा एक खुजा; जे कोणी विचारपूस करणारे मित्र भेटतील त्यांच्याकडे खायला मिळतील ते दोन घांस; आणि पडायला मिळेल ती जागा; " जगांतील सारें वैभव, सारें रूप, सारें सौंदर्य — सारें सारें असार आहे, झूट आहे, " असें जणूं सांगणारी तुझी ती मुद्रा;-असा संन्याश्यासारखा, अवलियासारखा, देहाला त्याचे देहधर्म अर्पण करून, जीवनाच्या रंगभूमीवर तूं वावरत आहेस. तुझें सारें लक्ष अंतरात्म्यावर खिळलें आहे. आणि तो तुझा अंतरात्मा आपल्या दिव्य चक्षूंनें अखिल मानवतेच्या रक्त-बंबाळ हृदयाचें, विश्वांतील गूढ सत्यांचें दर्शन घेण्यांत निमग्न झाला आहे.

वज्रधारी इंद्रालाहि दाद न देणारा असा तुझा वज्रासारखा कणखर वज्रदेह ! पण तुझ्या दुर्दम्य निरंकुश अंतरात्म्यानें त्यालाहि नमविलें आहे.

रात्र आणि दिवस दोन्हींहि तुला सारखींच ! नुसता तूं स्वस्थ बसून, इच्छेप्रमाणें स्वप्नसृष्टि अनुभवितोस. राजाधिराज सारखें तुझें जीवन आहे. कालाचे नियमहि मानण्याचें तूं सोडून दिलें आहेस. तूंहि एक आमच्यासारखाच परिस्थितीच्या दुर्निवार चक्रांत सांपडलेला एक मर्त्यच आहेस, याची तूं क्षणभरहि क्षिति बाळगीत नाहींस !

— २ —

पृथ्वीचे दूरदूरचे कानेकोपरेसुद्धां प्रकाशित करण्याचें दिव्य सामर्थ्य तुझ्यांत आहे. पण तूं स्वतः एकांतांत, एका सांदीकोंपऱ्यांत अप्रकाशांत पडून राहिला आहेस ! जोग-जलप्रपाता-( गिरसप्पाच्या धबधब्या )-प्रमाणें तूंहि एक निसर्गाचा अद्‌भुत आविष्कार आहेस ! तुझ्यांतीलहि अपार विद्युच्छक्ति अजून सुप्तच, अनुपयुक्तच आहे. तुझ्या काव्यांतून आणि नाटकांतून तिचा विद्युल्लतेप्रमाणें होणारा उन्मेष डोळे दिपवून टाकतो.

एकाद्या कदलीदलाप्रमाणें आपलें जीवन क्षुद्र मानून, त्याची तूं उपेक्षा केलीस. एकान्तांत बसून तेथील कोंपऱ्यांतून सगळ्या जगाचें तूं निरीक्षण केलेंस. तूं आपल्या स्वतःशीं म्हणत होतास : " जीवनाच्या या सागरावरील हे विविध आवर्त आणि उसळणारे उद्रेक तटस्थपणानें, साक्षी म्हणून कां पाहूं नयेत ? साक्षी म्हणून हीं सर्व दृश्यें पाहण्यांत किती दिव्य आनंद आहे, नाहीं ? "

जगाच्या न्यायासनासमोर कोणाच्याहि हर्षामर्षाची क्षिति न बाळगतां, साक्ष्याप्रमाणेंच तूं जें पाहिलें होतेंस तेंच आडपडदा न ठेवतां बोललास. राजा-महाराजांविरुद्ध तूं खरें तेंच बोललास. जगांतील दुटप्पीपणा आणि कपट यां-विरुद्ध तूं खरी तीच साक्ष दिलीस. लोकांनीं जर तुझ्या योगक्षेमाची कांहीं थोडी तरतूद केली असेल तर ती साक्षीदाराच्या भत्त्यादाखल म्हणून. तो भत्ता मिळाला








नसता तरी साक्ष देण्याचें कर्तव्य तूं केलेंच असतेस. कारण तें आपलें एक पवित्र कर्तव्यच तूं मानलेंस.

उत्तुंग देवकुलांप्रमाणें असलेली तुझी दृश्यकाव्यकला, तुझ्या आत्मपुरुषाची साक्षात् उत्स्फूर्त अशी दिव्य सृष्टिच होय! दिव्य शिल्पकार **जक्कणाचार्यां**प्रमाणें बाह्य, आगंतुक उपकरणांवर अवलंबून न राहतां तूं आपली नाट्यसृष्टि क्षणांत साकार केलीस.

आरश्यांत आरसा प्रतिबिंबित झाला असतांना जो बिंब-प्रतिबिंबांचा अद्भुत चमत्कार दिसून येतो, त्याच चमत्काराच्या मंत्रकलेची जादू तुझ्या कलेंत आहे. दिव्य जीवनाचे जे सहस्र किरण तुझ्या हृदयांत आणि बुद्धींत प्रतिबिंबित झाले त्यांचीं प्रतिबिंबें तुझ्या अंतरात्म्यांत पडलीं. तेथून निघणारे तेजाळ किरण तुझ्या चित्ताच्या निष्कलंक शुभ्र पटलावर पडले आणि काय चमत्कार! लगेच तेथून असे अद्भुत वाणीचे ध्वनि आणि अलौकिक प्रतिभेची रूपसृष्टि उमटली कीं, तिनें आमचीं हृदयें आनंदानें भरून टाकलीं! तूं निर्माण केलेल्या पात्रांच्या तोंडून निघणारी वाणी तुझ्या प्रतिभेच्या देदीप्यमान प्रकाशांत न्हाऊन निघाली आणि तिला श्रुतीचें, मंत्रांचें स्वरूप आलें. त्या पात्रांचें तूं केलेलें स्वभावविश्लेषण म्हणजे मानसिक विश्वाचें एक नवीन साक्षात् दर्शनच होय. तुझ्या नाट्यसृष्टींतून प्रतीत होणारें तुझें कथानियंत्रणतंत्र देवसृष्टींतून प्रतीत होणाऱ्या तंत्राइतकेंच निर्दोष आहे. तुझ्या कलेचा आस्वाद घेणाऱ्या रसिकाची अनुभूति दिव्य स्पर्श झाल्यासारखी थरारून जाते.

प्राचीनांच्या गूढ जीवनाचें कोडें उलगडण्याच्या प्रेरणेनें तूं महाभारतादि प्राचीन काव्यांचें आलोडन केलेंस. तुझ्या हृदयाची रंगभूमि सोमवंशीय राजसोमांनीं आणि रघुवंशाला ललामभूत झालेल्या राजसूर्यांनीं भरून गेली. यादवाग्रणी श्रीकृष्णहि तेथें होतेच. त्यांच्या रूपानें एकत्र एकवटलेल्या त्या भव्य उदात्ततेला तूं वाचाल केलेंस. ते जें बोलले तेंच तूं बोललास आणि तुला जें साक्षात् दिसलें तें—अगदीं त्यांतील बारीकसारीक तपशीलसुद्धां—तुझ्या नाट्य-कृतींतून तूं हुबेहूब उतरविलेंस!

असेंच एकदां तुझ्या हृदयाच्या रंगभूमीवरील चाललेल्या एका नाट्य-प्रवेशांत वशिष्ठ महर्षि आले होते. ते तुझ्या मनःश्चक्षूसमोर अवतीर्ण झाले खरे. पण त्यांचे ओठ हालेनात. ते निस्तब्ध होते. कित्येक आठवडे झोंपेविना, अन्नाविना त्यांच्या आर्ष वाणीची प्रतीक्षा करीत तूं चिंतेंत चूर होऊन राहिलास. शेवटीं एकदांची त्या महर्षींच्या मुखांतून गंभीर सरस्वती स्रवूं लागली. तुला धन्यता वाटली व तिला तूं शांत चित्तानें आपल्या मुखावाटें वाट करून दिलीस. महर्षींची आर्ष सिद्धि अशी तुझ्या वाणींतून स्रवत असतांना, तुझ्या दिव्य प्रतिभेची कलासृष्टि जगाला शिरसावंद्य झाली नाहीं तरच नवल!

करतलावरील आमलकाप्रमाणें जग तुझ्या डोळ्यांना सर्व अंगांनीं स्पष्ट दृग्गोचर होतें. भूतकाल आणि वर्तमानकाल हे आपलें सर्व रहस्य व गौडबंगाल तुझ्यापुढें उघडें करून दाखवितात. तीं सर्व रहस्यें आपल्या कलेंत साकार करून तूं भविष्यकाळाचा अग्रदूत झाला आहेस.

एका सुंदर गुलाबाच्या झाडाला एक सुंदर गुलाबाचें फूल आलें. त्या बहरून आलेल्या सुमनाच्या लालभडक रक्तिम्यामध्यें त्या झाडानें जणूं आपलें सर्व रक्त-












सर्वस्व ओतलें होतें ! त्या झाडाला दुसरी कळी वा दुसरा बहर कोणताच दिसत नव्हता. तूं हें पाहून म्हणालास : "या हिरव्या झाडाला एवढा सगळा लाल रक्तिमा आला कोठून, ईश्वर जाणे ! !"

मित्रमंडळींबरोबर तूं जात असतांना वाटेंत तुला एका म्हाताऱ्यानें अडविलें. तो तुला आपल्या स्वतःच्या मोठेपणाच्या वडेजावाच्या गोष्टी सांगून सतावूं लागला. तूं मोठ्या आदरानें त्या म्हाताऱ्याची बडबड ऐकत होतास, हें पाहून आश्चर्यचकित झालेला एक मित्र तुझ्या कानांत हळूंच म्हणाला, "हा म्हातारा ही एक अजब वल्ली आहे बरं का ?". "अजब कसली, नेहमींचीच" तूं उत्तर दिलेंस.

ज्यांत भरत आपली महत्त्वाकांक्षी माता कैकेयी हिला भेटायला येतो, त्या नाट्यप्रवेशाचा साक्षात्कार व्हावा म्हणून तूं महिने नि महिने त्याची सारखी प्रतीक्षा करीत होतास. तुझ्या प्रतिभेच्या मानससरोवरांत अंतर्मनानें गळ टाकून त्या प्रवेशाचा वेध घेण्याकरितां तूं ठाण मांडून बसला होतास ! एकदां आपण बोलत असतांना मध्येंच अचानकपणें तूं उठलास आणि बाहेर रजनीकडे मोठ्या विस्फारलेल्या नेत्रांनीं टक लावून पाहूं लागलास ! मी बसलों होतों ती खुर्ची माझ्याकडून जोरानें ओढून घेतलीस आणि तिला टेकून तो सबंध भरत-कैकेयी-प्रवेश — जसा तो बाहेर रात्रीच्या फलकावर साकार झालेला तुला दिसत होता तसा तो थेट— साभिनय करून दाखविलास ! अंगांत आल्याप्रमाणें, त्या प्रवेशांतील संवाद जसा तूं ऐकत होतास तसा सर्वच्या सर्व अश्रुपूर्ण नयनांनीं तूं म्हणून दाखविलास !

तुझ्या भाल-प्रदेशीं शंकराचा तृतीय नेत्र आहे. त्यानें जें तुला दर्शन होतें त्यांतून तुला जीवनरहस्याचा साक्षात्कार होत असला पाहिजे. तसें नसतें तर, तुझ्या नाटकांतून सबंध जगाच्या रंगभूमीवरील जे अनंत काळचे विशाल विविध अनुभव तूं प्रकट करतोस ते तुला कसे प्रकट करतां आले असते ? तुझ्या अंतरात्म्याला होणारा अनंत साक्षात्कारच तुझ्या दृश्य काव्यसृष्टींतून मूर्त झाला आहे.

— ३ —

स्वातींतील वळवाच्या पावसाप्रमाणें पौराणिक नाटकांच्या सरींवर सरी पडून, कन्नड रंगभूमीवर अगदीं खच झाला होता. कन्नड रंगभूमि पंकिल होऊन लडबडून गेली होती. पण तुझीं नाटकें जेव्हां त्या रंगभूमीवर अवतीर्ण झालीं, त्या वेळीं एक नवीनच जाणीव उदयास आली. आपल्या बोटांनीं वाती करीत, विधवा स्त्रिया ज्या उत्सुकतेनें व आदरानें पुराण श्रवण करतात ती उत्कट उत्सुकता व आदर तुझ्या नाटकांनीं निर्माण केला. 'अशुभ' समजल्या जाणाऱ्या लाल पातळांचें शुभ आगमन कन्नड रंगभूमीवर अशा रीतीनें करवून तूं तिला नवीन जीवन दिलेंस. मानवी अंतरात्म्यावरील सर्व आवरणें, पुटें काढून त्याच्या निर्भेळ अंतरंगाचें दर्शन करून देण्याचें तूं कंकण बांधलेंस.

तुझें तें गडगडणारें विशाल आणि चिरनवीन हास्य ! कुसुमकोमल आणि वज्रकठोर अशा तुझ्या त्या हास्यानें आम्ही स्तिमित होऊन त्यापुढें नम्र होत असूं. तुझ्या शोकान्त नाटकांतील कांहीं शोकपूर्ण प्रवेश अनुभवल्यावर कोणीहि अशी सहज कबुली देईल कीं, सबंध वाङ्मयविश्वांत, सबंध शब्दसृष्टींत इतकी काळीकुट्ट रात्र—चन्द्र नाहीं, तारकाहि नाहींत अशी भयंकर काळीकुट्ट अमावास्या—पूर्वी आपण कधींहि अनुभविलेली नाहीं !




मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास



## कैलासम् : कर्नाटकाचा साक्षी नाट्याचार्य

जगाचीं सुखदुःखें तूं स्थितप्रज्ञाप्रमाणें पाहतोस. जगाचे सर्व संकेत, रूढी, लोकपद्धती सत्याच्या काहिलींत टाकून त्यांतील सत्यासत्यता तूं पारखून घेतोस; असत्याची वाफ होऊन गेल्यावर बाकी राहिलेल्या टिकाऊ सत्याचाच तेवढा अर्क तूं काढून घेतोस.

पापिष्ठाच्याहि हृदयांत पुण्याचीं, नीतीचीं बीजें अंकुरतात तर उलट गुणी साधूच्याहि मनांत दुर्गुण व अनीति घर करून चिवळत असतात, ह्याचें तूं आपल्या कलाकृतींतून दर्शन करून देतोस. परंपरागत धर्माच्या गाभ्यालाच अन्याय आणि विषमतेची कीड लागलेली असल्यामुळें तो धर्म मारक ठरतो, तर उलट, न्याय आणि समता यांच्या साहचर्यामुळें लोकायतपंथीयांचा जडवादहि तारक ठरतो, ह्या ढळढळीत सत्यावर तुझ्या प्रतिभेनें विदारक प्रकाश पाडला आहे. अंतःसृष्टि आणि बहिःसृष्टि यांना तुझ्या कलाकृतींतून मूर्त करून तूं आगामी युगांतराच्या धर्माची स्थापना केली आहेस. स्वतः अप्रकाशांत, एकांतांत बसून तूं साक्षात् जीवनाच्या उगमाजवळील खळाळणाऱ्या झऱ्यांत बुडी मारतोस आणि तेथून सदैव नवीन अशीं सौन्दर्यें बाहेर काढतोस.

हे श्रेष्ठ नाट्याचार्य, हे नटराज ! जगाच्या नेहमींच्या उघड्या रंगभूमीवरील होणाऱ्या नाटकांतील पात्र बनायचें तूं नाकारलेंस. तूं आपल्या स्वतःच्या कल्पना-सृष्टींतून उत्स्फूर्त झालेल्या नाटकांतील प्रवेश करून दाखविलेस. रंगदेवतेच्या समोर, वेदीवर आपल्या वैयक्तिक सुख-दुःखांचा होम करून, तूं केवळ एका तटस्थ प्रेक्षकाची, साक्षित्वाची भूमिका पत्करलीस व अनासक्तियोग आचरणाऱ्या निर्लिप्त स्थितप्रज्ञाची कृतार्थता प्राप्त करून घेतलीस.

---

## कला म्हणजे आत्माविष्कार : (टी. पी. कैलासम् यांचें पत्र)

Moryalaya, Mowbray's Road,
Royapettah, Madras.
October 28th, '41

My dear Brother,

Kindly overlook my seeming remissness in this my belated acknowledgement of your frank letter.

Apropos the matter in your note, here is my sense for what it is worth.

The inexorable Law of Art is :

' न शास्ता न शास्त्रम्
न शिष्यो न शिक्षा
न च त्वम् न चाहम् '








There never is a Teaching, Learning & Reading! It is all Searching, Spurning & Brooding! There is no Attaining, say, a Dewanship by distinction of service! It is but, surely, Retaining a Kingship by Extinction of Self! It is an Abjuring of Ambition and an Absorbing of Absolution! It is a triumph of Intrinsic Temperament over Exotic Environment! It is an Erasing of Entity and an Embracing of Entirety!

The Slime of the Lake which sustains all its habitants alike can no more infuse winsome form, winning pink and witching fragrance into the Moss, ......than it can induce musty, fusty feel and stench, and greasy greenish clammy colour and look, out of the Lotus!

Art is an IMPRESSION INBORN INTUITIVELY although in terms of an Expression sensed Extuitively!

Hence you will see the futility of my or any other man's help to you in your own aspirations! Perhaps if you look around you to try and detect some factor...... *common* to Man & Beast, Monarch & Murderer, Prince & Poltroon, Sinner & Saint, Star & Slime, ......you may some day see in all these something in *common* with your own Self! The moment you do this, Self-Expression will follow as truly as the river starts to meander almost the very moment the stormy shower batters itself on the mountain peak!

Hence : ORA COGITA et VIGILA!

Sincerely regretting my short-comings to serve you, permit me, to remain,

yours fraternally,

( sd.) *Kailasam.*

---

[ श्री. **कैलासम्** यांना अनेक तरुण लोक पत्रें पाठवून लेखनकला कशी हस्तगत करावी याबद्दल त्यांना मार्गदर्शन विचारीत. श्री. कैलासम् यांना सर्वांना उत्तरें द्यावयाला क्वचितच सवड होत असे व एखाद्याच वेळीं ते उत्तर लिहीत. वर दिलेलें पत्र असेंच एक एकमेव नसलें तरी अतिविरळांपैकीं एक होय. या पत्रांत श्री. कैलासम् यांनीं 'कला म्हणजे काय?' याविषयींच्या आपल्या मतांचें आपल्या वैशिष्ट्यपूर्ण शैलीनें दिग्दर्शन केलें आहे. **याच पत्राचा मराठी अनुवाद पुढील पानावर दिला आहे.** श्री. कैलासम् यांच्या इंग्रजी भाषेवरील असामान्य प्रभुत्वानें नटलेल्या शैलीची छाया मराठी अनुवादांत आणतां आलेली नाहीं, हें तज्ज्ञांना कळून येईल. प्रस्तुत दुर्मिळ पत्र 'नवभारता'ला उपलब्ध करून दिल्याबद्दल कै. कैलासम् यांचे एकनिष्ठ अंतेवासी श्री. **बी. एस्. रामराव** यांचे मनःपूर्वक आभार.

**—कार्यकारी संपादक** ]



अनुक्रमणिका





# कला म्हणजे आत्माविष्कार

मोर्यालय, मोब्रेज रोड, रोयापेट्टा, मद्रास

" प्रिय बंधो,

तुमच्या प्रांजळ पत्राची पोहोंच देण्यांत माझ्याकडून झालेल्या प्रमादाची गय करा. तुम्हीं पत्रांत ज्या विषयासंबंधीं विचारलें आहे त्यासंबंधीं माझे जे कांहीं भलेबुरे विचार आहेत ते असे :

कलेच्या क्षेत्रांत एक दुर्निवार, अनुल्लंघनीय नियम लागू असतो :

'न शास्ता न शास्त्रम् न शिष्यो न शिक्षा । न च त्वम् न चाहम्... ॥'

शिकविणें, शिकणें, वाचणें असें कधींच नसतें. त्याऐवजीं जें संशोधन, निराकरण, मनन होतें तेंच खरें.

कशाची तरी प्राप्ति--उदा० कांहीं विशेष कामगिरी करून दिवाणगिरीची प्राप्ति-करून घ्यायची अशी खरोखरीं वस्तुस्थिति नाहीं. उलट, आहे त्याचेंच ज्ञान आणि रक्षण यांतच-उदा० अहंचा विलोप करून खरें राजपद, स्वराज्य प्राप्त करून घेणें-यांतच खरी कृतार्थता आहे. हा अहंचा विलोप म्हणजेच स्वैर महत्त्वाकांक्षी वासनांचा त्याग करणें व मुक्ति आत्मसात् करून घेणें होय. अंतर्गत वृत्तीचा बहिर्गत परकी परिस्थितीवर विजय तो हाच ! यायोगेंच व्यक्तित्वाचें विसर्जन होऊन पूर्णत्वाला गवसणी घालतां येते.

या जीवनाच्या सरोवरांतील कर्दमांत सगळेच राहतात आणि त्या कर्दमानें सगळ्यांचेंच पोषण होत असतें येथील शेवाळाला कमळाचें सुंदर रूप, त्याचा आकर्षक आरक्त रंग आणि हृदयंगम सुगंध कर्दम अर्पू म्हणेल तर तें जसें कर्दमाला शक्य नाहीं, तसेंच कमळांतून बुरसट, घाणेरडें, दुर्गंधी, चिकट, बुळबुळीत, हिरवट रंगाचें शेवाळ उत्पन्न करणेंहि कर्दमाला शक्य नाहीं !

कला म्हणजे स्वतःच्याच अंतःप्रेरणेंतून स्वयं उत्स्फूर्त होणारा पण बाह्य इंद्रियांना गोचर होणाऱ्या माध्यमाच्या द्वारें प्रकट होणारा एक संस्कार होय. म्हणून तुमची स्वतःची उन्नति करून घेण्याच्या बाबतींत माझें किंवा कोणा दुसऱ्याचें साहाय्य तुम्हांला व्हावें हें म्हणणें किती फोल आहे हें तुम्हांला कळून येईल. तुम्हींच जर आपल्या भोंवतीं आजूबाजूला चौकस बुद्धीनें बघितलेंत तर तुम्हांला मानव आणि पशु, बादशहा आणि खुनी डाकू, राव आणि रंक, पापी आणि साधु, चांदणी आणि चिखल या परस्पर विजोड जोड्यांमध्येंहि कांहीं तरी समान आहे असें आढळून येईल. किंबहुना या वरील सर्व गोष्टी व आपण स्वतः यांमध्येंहि कांहीं तरी समान आहे, असाहि एखाद्या सुदिनीं तुम्हांला अनुभव येईल. ज्या क्षणीं तुम्हांला ही अनुभूति येईल त्या क्षणीं तुमच्या कलात्मक आत्माविष्कारास सुरुवात होईल. पर्वतशिखरावर एकदां झंझावाती पर्जन्यवृष्टि जोरानें बरसूं लागली कीं लगेच ज्याप्रमाणें नदी खळाळून वाहूं लागते, त्याप्रमाणेंच तुमचा आत्माविष्काराचा झरा खळाळून वाहूं लागेल.—त्याकरितां प्रार्थनापूर्वक मनन करीत सदैव जागृत रहाणें हीच साधना.

यापेक्षां अधिक साहाय्य तुम्हांला देण्याच्या बाबतींत मी असमर्थ आहे, याबद्दल वाईट वाटतें.

तुमचा बंधु,

**कैलासम्** "

ऑक्टोबर २८, १९४१








डॉ. सर सी. आर्. रेड्डी

# कैलासम् यांचा एकलव्य

डॉ. कझिन्स यांच्या शब्दांत सांगायचें तर, कैलासम् यांनीं 'समकालीन जीवनाचे एक महान् भाष्यकार' ('a critic of contemporary life') म्हणून उच्च यश निर्विवादपणें संपादन केलें आहे. हिंदुस्थानांत अगदीं थोडे नाटककार असे आहेत कीं, ज्यांच्या नाट्यकृती, खऱ्या काव्यकृतींप्रमाणें, मूलतः जीवनावरील भाष्यें (a criticism of life) आहेत असें म्हणतां येईल. अशा अगदीं थोड्या नाटककारांपैकीं श्री. कैलासम् हे एक असून, त्यांचीं बहुतेक नाटकें वरील लक्षणाच्या कसोटीला उतरणारीं आहेत.

### प्रतिभाशाली भाष्यकार

एकलव्यावरील प्रस्तुत 'Purpose' या नाटकांत, कैलासम् यांच्या कलेचा एक नवीन पैलू अत्यंत उज्ज्वलपणें आपणांस प्रतीत होतो. आपल्या प्राचीन वाङ्मयांतील कथानकांचा, विशेषतः महाभारतांतील कथा व त्यांतील पात्रें यांचा, त्यांनीं अगदीं नवीन स्वतंत्र अर्थ लावून दाखविला आहे. महाभारत हें जगांतील वाङ्मयांतील एक श्रेष्ठ अग्रगण्य महाकाव्य होय. कालिदासाच्या पूर्वी होऊन गेलेल्या भास कवीनेंहि आपल्या नाटकांतून महाभारतांतलि सध्यांच्या कथांचा किंवा त्याच्या काळीं जशा त्या महाभारतांतील कथा प्रचलित होत्या त्यांचा नवीन स्वतंत्र अर्थ (interpretation) लावून दाखविला आहे. महाभारतांतील कथांमध्यें नवीन आशय किंवा अर्थ ओतणारे अगदीं अलीकडचे प्रतिभाशाली भाष्यकार म्हणजे भारताचे आधुनिक कविसम्राट् रवींद्रनाथ टागोर हे होत. त्यांनीं महाभारतांतील पात्रांवर व कथानकांवर बरींच लहान लहान नाटकें लिहिलेलीं असून, त्यांमधून त्यांनीं महाभारतांतील कर्ण, गांधारी, धृतराष्ट्र, अर्जुन, चित्रांगदा इत्यादि पात्रसृष्टींतून अमर नायक व नायिका निर्माण केल्या आहेत, त्यांनीं त्या विविध पात्रांच्या अंतरंगांतील अंतर्मुखते- (inwardness) चा एक अपूर्व आविष्कार करून दाखविला आहे. श्री. कैलासम् यांच्या प्रतिभेलाहि महाभारतांतील पात्रांच्या अंतरंगांतील सौन्दर्याचें जबरदस्त आकर्षण वाटलें. त्यामुळें तेहि

---

महाभारतांतील एकलव्याच्या कथानकावर श्री. **कैलासम्** यांनीं तीन नाटकें इंग्रजींत रचलीं : (१) The Purpose (२) The Fulfilment (३) The Expiation. त्यांपैकीं पहिलें 'Purpose' हें नाटक प्रकाशित झालें आहे. इतर दोन अजून प्रकाशित व्हावयाचीं आहेत. कैलासम् यांचीं हीं तिन्हीं नाटकें वाचून त्यांसंबंधीं **सर सी. रामलिंग रेड्डी** यांनीं आपला त्यावरील अभिप्राय व्यक्त करणारें एक गुणग्रहणात्मक इंग्रजी टिपण लिहून काढलें. तें अजून अप्रकाशित आहे. श्री. कैलासम् यांचे 'लेखक' अंतेवासी श्री. बी. एस्. रामराव (बंगलोर) यांच्या कृपेनें 'नवभारता'ला तें उपलब्ध झालें आहे. त्याचा समग्र अनुवाद प्रस्तुत लेखरूपानें दिला आहे. कै. **सर सी. रामलिंग रेड्डी** (१८८० जन्म) डी. लिट्. एम्. ए. (केंब्रिज) हे आंध्र विद्यापीठाचे व त्यानंतर म्हैसूर विद्यापीठाचे व्हाइस-चॅन्सेलर होते. ते गेल्या वर्षीं निधन पावले. —का. सं.



अनुक्रमणिका

या श्रेष्ठ प्रतिभाशाली भाष्यकारांच्या थोर पंक्तींत जाऊन बसले आहेत.

एकलव्याचें कथानक महाभारतांत आदिपर्वांत आलें आहे. पुढें द्रोणपर्वांत एकलव्याचा नुसता ओझरता उल्लेख आहे.

माझ्या माहितीप्रमाणें या एकलव्याच्या कथानकाला आतांपर्यंत दुसऱ्या कोणींहि स्पर्श केला नव्हता. श्री. कैलासम् 'एकलव्या'ला हात घालणारे पहिलेच होत. एकलव्य त्यांचेंच ' पेटंट ' होय !

### कैलासम्‌चे द्रोणाचार्य

कैलासम् यांनीं एकलव्याच्या कथानकांत जो नवीन आशय ओतला आहे तो दोन रीतींनीं: एक म्हणजे त्यांनीं पात्रांचें मूळ स्वभावरेखन बदलून टाकलें आहे व दुसरें म्हणजे त्यांनीं असे कांहीं प्रसंग व घटना निर्माण केल्या आहेत कीं, त्यांची अपूर्वाई व परिणाम आपल्या मनावर कायमचीं बिंबून राहतात ! पात्रांचें स्वभावरेखन त्यांनीं बदललेलें आहे. याचें उदाहरण म्हणजे त्यांनीं निर्मिलेल्या द्रोणाचें देतां येईल. त्यांनीं निर्मिलेला द्रोण महाभारतांतील द्रोणापेक्षां आधुनिक मनाला चांगला वाटतो. जेव्हां एकलव्य धनुर्विद्या शिकण्याकरितां नम्र विद्यार्थी म्हणून द्रोणाचार्यांकडे जातो, तेव्हां मूळ महाभारतांतील द्रोणाचार्य, एकलव्य निषाद जातीचा आहे म्हणून त्याला शिकवावयाचें नाकारतात. त्यांच्या मतें, धनुर्विद्या शिकावयाचा अधिकार फक्त ब्राह्मण व क्षत्रियांनाच आहे. अर्थात्, द्रोणांच्या या वृत्तीमागील त्या वेळची सामाजिक विचारसरणी इतिहासदृष्ट्या स्पष्टच आहे. ज्या वन्य जातींना विजिगीषु आर्यांनीं आपल्या वरिष्ठ शस्त्रास्त्रसामर्थ्यानें जिंकलें, त्या जित जमातींना ती शस्त्रास्त्रविद्या जेत्या आर्यांनीं शिकविणें शक्यच नव्हतें. हल्लींचे युरोपीय साम्राज्यवादी तरी आफ्रिका व आशियामधील लोकांना आधुनिक युद्धतंत्रांतील रहस्यें कोठें प्रकट करतात ? मला असें वाटतें कीं, प्राचीन आर्य असोत किंवा आधुनिक युरोपीय साम्राज्यवादी असोत, त्यांना या वागणुकीबद्दल दोष लावणें सयुक्तिक होणार नाहीं. आपल्या शस्त्रास्त्रविद्येचें रहस्य सांगून आपल्या आसनाखालीं सुरुंग लावण्याचें, थोडक्यांत आपली राजकीय आत्महत्या करण्याचें, त्यांनीं नाकारणें साहजिकच होय. परंतु आज वंशवाद किंवा जातिवाद ही गोष्ट आधुनिक मनाला न रुचणारी, किंबहुना चीड आणणारी समजली जाते. म्हणून द्रोणांनीं एकलव्यास शिकवावयाचें जें नाकारलें त्यावर निराळीच उपपत्ति श्री. कैलासम् यांनीं बसविली आहे. " माझ्या ताब्यांत शिक्षणाकरितां जे कुरुपुत्र सोंपविले आहेत, त्या सर्वांचें शिक्षण झाल्याशिवाय मी आणखी कोणीहि विद्यार्थी घेणार नाहीं असें अभिवचन मीं भीष्माचार्यांना दिलें आहे " असें कैलासम् यांचे द्रोणाचार्य सांगतात. अर्थात् यामुळें, किंबहुना जेथें जेथें जुन्या कथांवर नवीन अर्थ बसविण्यांत येतो तेथें तेथें, अशा Interpretation च्या प्रक्रियेंत, नीतिशास्त्राप्रीत्यर्थ इतिहासाची आहुति दिली जात असते हें खरें !

### नवीन अर्थसंगति

कैलासम् यांनीं एकलव्याच्या कथानकांतून जी नवीन अर्थसंगति सुचविली आहे, तिचा गाभा किंवा रहस्य दोन गोष्टींत आहे, आणि त्या दोन गोष्टी अखिल मानवतेला आज अत्यंत महत्त्वाच्या आहेत. पहिली गोष्ट अशी कीं, एकलव्य आपल्या घरीं एकान्तवासांत जाऊन, द्रोणाचार्यांच्या मूर्तीची पूजेकरितां प्रतिष्ठापना करतो आणि आपल्या एकाग्र अव्यभिचारी भक्तीनें आणि स्वावलंबी प्रयत्नानें अर्जुनापेक्षांहि वरचढ असें धनुर्विद्यानैपुण्य प्राप्त करून घेतो. आत्मोन्नति साधण्याच्या कामीं तप ही एक प्रभावी साधना आहे हें आपल्या प्राचीन संस्कृतींतून सदैव उद्‌घोषित होणारें सत्य आहे. अव्यभिचारी निष्ठा आणि एकाग्रतेनें केलेला पुरुषप्रयत्न यांचें सामर्थ्य किती प्रचंड आहे हें या नाटकाच्या द्वारें दाखवून श्री. कैलासम् यांनीं निश्चित ध्येयाच्या अभावीं वाहवत जाणाऱ्या आणि परिस्थितीच्या हातांतील एक खेळणें बनलेल्या बिचाऱ्या आधुनिक भारतीयांच्या पुढें एक आदर्श ठेवला आहे.

दुसरें म्हणजे श्री. कैलासम् यांनीं एक नवीन सत्य–तें अगदीं नवीन नसलें तरी जुन्यांतच नवीन प्राण ओतून नवीन केलेलें असें सत्य—








निःसंदिग्ध रीतीनें मांडलें आहे. तें सत्य असें कीं, स्वार्थी हेतूनें संपादिलेली विद्या ही परार्थ, निःस्वार्थी प्रेरणेनें संपादिलेल्या विद्येइतकी प्रभावशाली नसते. एकलव्याच्या मानानें अर्जुन हिणकस ठरतो. धनुर्विद्यानैपुण्य संपादण्याच्या मागें अर्जुनाची प्रेरणा अहंकाराची, स्वतःच्या बडेजावाची असून, त्यामुळें साहजिकच तो आपल्या प्रतिस्पर्ध्याचा मत्सर करतो आणि आपलें वैयक्तिक स्थान टिकवून ठेवण्याकरितां क्षुद्रपणाचें अवलंबन करावयाला मागेंपुढें पाहात नाहीं. त्याच्या उलट, एकलव्याची धनुर्विद्येमध्यें नैपुण्य संपादण्यामागील प्रेरणा अगदीं निराळी आहे. लांडग्यांपासून हरिणबालकांना वांचविण्याची त्याची इच्छा आहे. याचाच अर्थ असा कीं, बळींच्या विरुद्ध दुबळ्यांचें, दुष्टांविरुद्ध सुष्टांचें रक्षण करणें हा त्याचा विद्यासंपादनामागील हेतु आहे. या उदात्त प्रेरणेमुळेंच, केवळ शास्त्रीय सत्यापेक्षां उच्च असलेल्या या नैतिक सत्यामुळेंच, एकलव्य प्रत्यक्ष द्रोणाचार्यांनाहि धनुर्विद्येमध्यें मागें टाकतो. हेतूमागील ही जी उदात्त नैतिक प्रेरणा श्री. कैलासम् यांनीं विविध व विरोधी पात्रांच्या स्वभावचित्रणाच्या खुलावटींतून विशद करून दाखविली आहे, तीच मला या नाटकाचा एक उदात्तरमणीय विशेष वाटतो. मानवाच्या कृतीमागील हें नैतिक हेतूचें दर्शन म्हणजे केवळ अर्थशून्य गूढवाद नव्हे; मानवी स्वभावांतील एका उदात्त सत्याचा तो एक आविष्कार आहे. या सत्याचें दर्शन वा त्यावरील विचार हा जरी सार्वत्रिक आढळून येत नसला, तरी त्या सत्याचीं उदाहरणें सार्वत्रिक आढळून येतात. एकाद्या नैतिक उदात्त हेतूनें प्रेरित होऊन लढणारी व्यक्ति किंवा राष्ट्र हें दूषित व मलिन सदसद्विवेकबुद्धीनें त्रस्त होऊन कसेंबसें लढणाऱ्या व्यक्ति वा राष्ट्रापेक्षां अधिक जोमानें व यशस्वीपणें लढत असतें. मनःशान्ति साधावयाची असेल, तर त्याकरितां सदसद्विवेकबुद्धि प्रामाणिक राहणें किती आवश्यक आहे, किंबहुना आपल्या सर्व जीवनाच्या धकाधकींतच सदसद्विवेकबुद्धीचें अभेद्य कवच आपणांस किती उपयोगी पडतें याची कल्पना फार थोड्यांना असेल ! कैलासम् यांनीं आपल्या नाटकाला 'Purpose' ('प्रयोजन') हें जें नांव दिलें आहे तें अगदीं समर्पक आहे. खरोखरीं त्यांत उदात्त हेतूमागील उदात्त प्रेरणेचें अपार सामर्थ्य निःसंदिग्ध रीतीनें चित्रित केलें आहे.

महाभारतांतील कथानकांत श्री. कैलासम् यांनीं आणखीहि कांहीं नवी भर घातली आहे तिचें थोडक्यांतच दिग्दर्शन येथें करतां येईल.—एकलव्याची माता ही कैलासम् यांचीच मानसकन्या असून तिचें चित्रण फार हृदयंगम झालें आहे. या नाटकांत चित्रित केलेल्या तिच्या स्वभावांत अंतःकरणाच्या सौंदर्याचा आणि शहाणपणाचा आविष्कार झालेला आहे विद्वत्ताविभूषित पंडित आणि दरबारी व्याजपूर्ण वागणूक असणारे नगरवासी यांच्यापेक्षां साध्या, निर्व्याज हृदयाच्या माणसांचें शहाणपण व समजूतदारपणा किती सखोल असतो यांचें प्रत्यंतर एकलव्याच्या मातेमध्यें मिळतें. कैलासम् यांनीं 'Purpose' नंतर एकलव्यासंबंधींचें आणखी एक नाटक 'Fulfilment' (परिपूर्ति) या नांवाचें लिहिलें, त्यांत श्रीकृष्ण एकलव्याला ठार मारतात असें त्यांनीं दाखविलें आहे. त्या नाटकांत एकलव्याचा ज्या रीतीनें श्रीकृष्णाच्या हातून अंत दाखविला आहे ती रीत कोणाहि माणसाच्या सदसद्विवेकबुद्धीला—मग तो सनातनी असो वा आधुनिक असो—पटणारी नाहीं. परंतु श्रीकृष्ण चांगलें व वाईट यांच्यापलीकडचे, सद् व असत् यांच्या अतीत आहेत. जसा सूर्य सुष्टांना-दुष्टांना सारखाच प्रकाश देतो, आपल्या किरणांनीं 'कुठें मेण वितळव तर ओली माती सुकव' अशासारखे परस्परविरोधी परिणाम घडवून आणतो, त्याचप्रमाणें श्रीकृष्णांचें आहे. जी सृष्टि आज हिरव्यागार पानांनीं आणि बहुरंगी फुलांनीं नटून, सभोंवार दूरवर सुगंध उधळून आपलीं नेत्रादि इन्द्रियें व हृदय आल्हादित करते, तीच सृष्टि उद्यां घोंघावणाऱ्या वादळांनीं आणि कडाडणाऱ्या विजांनीं रौद्रस्वरूपी दिसूं लागते ! तरी पण हीच सृष्टि आपल्याला जीवन व प्रकाश देणारी आहे अशी आपल्या हृदयांत प्रेममय श्रद्धा असतेच. 'परिपूर्ति' या नाटकांत कैलासम् यांनीं श्रीकृष्णहि



अनुक्रमणिका






असेच सुग्रीसारखे द्वंद्वमय पण द्वंद्वातीत असे चित्रित केले आहेत.

त्याबरोबर हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, ग्रीक व हिंदु यांच्या श्रद्धेप्रमाणें प्रत्यक्ष देव देखील नियतीनें बद्ध झालेले आहेत, कठोर कर्मगतीच्या पलीकडे त्यांनाहि जातां येत नाहीं महाभारतांत म्हटलेंच आहे :

' हरिणापि हरेणापि ब्रह्मणापि सुरैरपि
ललाटलिखिता रेखा वज्रलेपो भविष्यति ।। '

नाटककाराच्या नाट्यकृतींत जो ' काव्यगत न्याय ' ( Poetic Justice ) प्रकट होत असतो तो उपरिनिर्दिष्ट कर्मगतीचें, नियतीचें पार्थिव किंवा ऐहिक प्रतीक होय. कैलासम् यांचें यापुढें ( एकलव्याच्या कथानकाशीं संबद्ध असें ) तिसरें एक नाटक ' Expiation ' ( ' प्रायश्चित्त ' ) नांवाचें आहे. त्यांत त्यांनीं श्रीकृष्णालाहि ' प्रायश्चित्त ' देऊन ' काव्यगत न्याय ' ( Poetic Justice ) घडवून आणण्यांत आपल्या प्रतिभेची चुणूक दाखविली आहे. त्यांत, श्रीकृष्ण शेवटीं आतां आपली इहलोकची यात्रा संपवावी या विचारांत निमग्न असे एका झाडाखालीं बसले असतांना त्यांच्या गुडघ्याला एका निषादाचा बाण येऊन लागतो, हा बाण मारणारा निषाद दुसरातिसरा कोणी नसून एकलव्याचा मुलगाच आहे असें श्री. कैलासम् यांनीं त्या नाटकांत दाखविलें आहे.

### मानससृष्टीचा वंशवृक्ष

एकलव्याच्या कथानकावर तीन नाटकें लिहून कैलासम् यांनीं आपल्या प्रतिभेनें एक नवीन मानस-सृष्टि निर्माण केली आहे. या मानससृष्टीचा जो वंशवृक्ष माझ्यापुढें असा उभा राहतो त्याअन्वयें कैलासम् हे एकलव्याच्या आईचे जनक किंवा पिता, एकलव्याचे पितामह आणि एकलव्याच्या मुलाचे प्रपितामह होत.

कैलासम् यांनीं महाभारतांतील कथानकांत कायाकल्प घडवून आणला आहे, तो बघून आश्चर्य वाटतें. तो घडवून आणतांना, ' शाकुन्तल 'कार कालिदासापेक्षां त्यांनीं अधिक स्वातंत्र्य घेतलें आहे असें वाटत नाहीं. कैलासम् यांनीं आपल्या नाटकांतून महाभारताच्या ज्या कथा नवीन स्वरूपांत सादर केल्या आहेत, त्या अनेक बाजूंनीं अधिक सुंदर झाल्या आहेत, यांत शंका नाहीं अर्थात् व्यासांनीं जशा कथा सांगितल्या तशा त्याबरहुकूम कैलासम् यांनीं हुबेहूब सांगितल्या नाहींत हें खरें ! पण व्यासांनीं तरी आपल्या कथांतून मूळ वस्तुस्थितिच सांगितली असेल याला तरी प्रमाण काय ? खरोखरीं काव्यामध्यें सार्वभौम सत्य ( fact ) एकच असतें. तें म्हणजे कवीची प्रतिभा किंवा कल्पनाशक्ति. आणि कैलासम् यांच्या कृतींतून त्या प्रतिभेचाच साक्षात्कार आपणांस होतो, हें मात्र निश्चित.

---

## कवीची बिदागी !

A poet's guerdon is not gold
Not Parian bust, not trappings brave
A tear, a titter from young and old
Is all the meed I meekly crave.

—टी. पी. कैलासम्

नकोत मजला रत्नें कांचन
नकोत पुतळे संगमर्मरी
नकोत तुमच्या शाली, मंदिल
तसे दुपेटे ऐन भरजरी

हवा एक मज रसिक जनांचा
आंसू टचकन्, हांसू खुदकन्
... ... ...
शाहीराची हीच बिदागी !

कर्नाटकांतील महानाटककार कैलासम् यांचें ' The Purpose ' : प्रा. द. रा. बेंद्रे

# ' प्र यो ज न ' नाटकाविषयीं कांहीं विचार

Bheeshma— To realise the purpose is to realise Him ...( Raising his eyes aloft ) for, He knows the purpose of it all. Not we ! We know, but the use of all this training. As for the Final Purpose of it all ... we can only guess !

Drona—' Use ? ' ' Purpose ' ? ' Guess ? ' I don't understand !

—' The Purpose '

**' Purpose 'च्या भाषांतराचा पहिला मान**

कैलासम् यांचें ' The Purpose ' हें दोन अंकीं नाटक ' प्र यो ज न ' या नांवानें आज मराठींत भाषांतरित होऊन तात्काळ प्रसिद्धहि होत आहे, हा एक मोठा सुयोग होय. भाषांतरकार श्री. के. ना. काळे व त्या भाषांतराचे प्रकाशक ' नवभारता 'चें संचालकमंडळ या दोघांनाहि माझे स्वतःचे धन्यवाद अर्पण करीत आहें. ' आंतर-भारती'च्या निमित्तानें श्री. शं. बा. जोशी यांचें पुस्तक प्रसिद्ध झालें. श्री. मास्ती यांचा पुणे-करांना व्याख्यानकार म्हणून परिचय झाला. त्यानंतर कैलासम् यांचें हें अत्युत्तम नाटक मराठींत भाषांतरित होऊन प्रसिद्ध होत आहे. स्नेहाचा हा प्रवाह सतत पुढें चालू राहिल्यास महाराष्ट्र आणि कर्नाटक यांच्यांतील सांस्कृतिक संबंध परिणामतः बऱ्या प्रकारचे होतील अशी आशा आहे. कैलासम् स्वतः कांहीं दिवस पुण्यांत होते. त्यांचे जांवई प्रा. गणनाथन् हें पुणें विश्वविद्यालयांत भूगोलविद्येचे अध्यापक म्हणून सध्यां आहेत. आणि ' The Purpose ' नाटकापाठीमागें सूत्रचालकाप्रमाणें असलेले, कैलासम् यांचे गुरुमित्र योगी तारानाथ हेहि पुण्याच्या रसिकांना व्याख्यान-कार म्हणून प्रिय झाले होते. कित्येकांना कदाचित् हा बादरायण संबंध वाटेल. पण हा योगायोग लक्षांत घेण्यासारखा आहे.

पुष्कळ वर्षांपूर्वी शिक्षण-संमेलनाच्या निमित्तानें प्रा. वै. का. राजवाडे, ( तेव्हां नुसते प्रा. ) द. वा. पोतदार इत्यादि महाराष्ट्रीय विद्वान् मंडळी धारवाडास गेली होती. त्यांच्याकरितां कैलासम् यांनीं आपल्या ' The Purpose ' नाटकाचें खास वाचन केलें होतें. वाचन संपल्यानंतर प्रा. राजवाड्यांनीं कैलासम् यांना पितृवत् आलिंगन देऊन ' कृति उत्तम आहे उत्तम हा शेरा मी सहसा उगीच कोणाला देत नसतों ' असे उद्गार काढले. प्रा राजवाड्यांचा महागंभीर स्वभाव माहीत असलेल्यांना, त्यांच्या या उद्गारांची काय किंमत आहे हें सहजच कळेल. त्यांच्या त्या आशीर्वादाचें फळ म्हणून ' The Purpose ' या नाटकाच्या भाषांतराचा पहिला मान महाराष्ट्राला मिळत आहे.

कैलासम् यांनीं आपलें पहिलें कानडी नाटक ' टोळ्ळु गट्टी ' हें १९१८ त लिहिलें. १९२० ला ' The Purpose ' चा पहिला अंक लिहिला गेला. आणि दुसरा अंक १९२६ मध्यें संपला. कैलासम् यांच्या हयातींतच इ. स. १९४४ मध्यें दोन्ही अंक मिळून पहिल्याप्रथम पूर्ण पुस्तकरूपानें ' The Purpose ' नाटक प्रसिद्ध झालें. त्या-बरोबर त्याच वर्षी कैलासम् यांचे तरुण मित्र जी. पी. राजरत्नम् या समीक्षकांनीं त्या नाटकाचें रसास्वादन (—अवलोकन नव्हे— सविस्तर प्रबंधाच्या स्वरूपांत कानडींत प्रसिद्ध केलें. ' The Purpose ' नाटकाच्या पहिल्या अंकांतील कांहीं भाग तारानाथ-रावांच्या ' प्रेम ' या त्रैमासिकांत प्रसिद्ध झाला होता. आणि या दोन्ही अंकांचें वाचन कर्नाटकांत शंभर ठिकाणीं शंभरदां तरी कैलासम् यांच्या मुखानें झालें असेल ! यामुळेंच जणुं या नाटकाच्या भाषां-तराची कर्नाटकाला आंच वाटली नसावी !



अनुक्रमणिका








# ' प्रयोजन ' नाटकाविषयीं कांहीं विचार

' The Purpose ' हें नाटक या टोंकापासून त्या टोंकापर्यंत कैलासम् यांच्या हातचें आहे. अलीकडे प्रसिद्ध झालेल्या 'Keechaka' या नाटकाची गोष्ट मात्र निराळी आहे. ' Purpose ' या नाटकाची घडण वसतांना तारानाथराव यांच्या चर्चेचा फायदा कैलासम् यांना लाभला. परंतु त्याबरोबर हेंहि खरें कीं, या नाटकांत सूचित होणारा शिक्षणविषयक दृष्टि-कोण हा कैलासम् यांचाच होता. या नाटकाशिवाय कैलासम् यांचें ' Karna ' (The Brahmin's Curse : An impression of Sophocles in five acts. ) हें नाटक १९४६ मध्यें प्रसिद्ध झालें. कानडी भाषेंत त्यांचीं पंधरा-वीस नाटकें व प्रहसनें प्रसिद्ध आहेत. याशिवाय त्यांच्या तोंडून वाऱ्यावर विमानाप्रमाणें उडून गेलेलीं नाटकें किती याची गणतीच नाहीं ! रामायण व महाभारत यांच्या स्फूर्तीनें कैलासम् यांनीं किती तरी नाटकें इंग्रजींत रचलीं आणि स्नेह्यांच्या श्रवणींहि पाडलीं. कैलासम् हे स्वत: वऱ्यापैकीं नट होते. देह पहिलवानाचा, राहणी अवधूताची ! त्यांना आवेश आला म्हणजे काय ऐकायला मिळेल आणि काय पाहायला मिळेल याचा अंदाजहि करवत नसे. त्यांच्या नाट्याचें दृश्य पाहतांना आणि नाटकांचें श्रवण करीत असतांना श्रोते गोंधळून जात असत, गर्क होत असत आणि तो खेळ संपल्यावर आपण कोणत्या तरी उन्नत अशा लोकांतून मानवी भूमीवर उतरत आहोंत असा त्यांना अनुभव येई. कर्नाटक देशाचें व भाषेचें भाग्य कीं, एवढीं तरी नाटकें हातीं लागलीं. कैलासम् हे स्वतःच एक महान् नाटक होते ! आणि तें नाटक त्यांच्या ६२ वर्षांच्या जीवनांतहि पूर्ण झालें असें म्हणवत नाहीं. एका अर्थीं 'The Purpose' नाटकहि अपूर्णच आहे. याच नाटकाचा पुढील भाग ' Fulfilment ' हें एकांकी दृश्य 'Little Lays and Plays' या संग्रहांत १९३३ सालीं प्रसिद्ध झालें खरें, परंतु तें १९४४ च्या 'The Purpose' बरोबर प्रसिद्ध केलें गेलें नाहीं. एवढेंच नव्हे, त्याचा ' Expiation ' नांवाचा आणखीहि एक तिसरा भाग होता. हे तिन्ही मिळून हें नाटक खरें पूर्ण होईल. ' Expiaton 'चा भाग मीं एकदां त्यांच्या तोंडून ऐकला होता. तो भाग त्यांचे तरुण मित्र श्री. बी. एस्. रामराव यांच्या हातून प्रकाशित होणार आहे किंवा काय तें पाहावें.

### जुन्या कथानकाला नवीन वळण

' The Purpose '– ' प्र यो ज न ' या नाटकाची कथा प्रख्यात आहे. ती म्हणजे महाभारतां-तील एकलव्य-आख्यान होय. पण कैलासम् यांनीं या कथेला जें वळण दिलें आहे त्यामुळें मूळ कथानकाचें स्वरूपच बदलून गेलें आहे. परंतु तें कैलासम् यांच्या उद्देशाला धरून आहे, हें त्यांच्या तिन्ही भागांच्या संपूर्ण अवलोकनानें लक्षांत येणार आहे. असें असूनहि ' The Purpose ' हें नाटक स्वयंपूर्ण वाटतें. याचें मुख्य कारण म्हणजे एकलव्याचें माहात्म्य गुरुभक्तीमुळें त्यानें केलेल्या अंगुष्ठदानांत आहे. परंतु खऱ्या प्रयोजनाचा रोख ' Fulfilment 'मध्येंसुद्धां संपत नसून, तो ' Expiation ' मध्यें या ' Purpose ' चा सूत्रधार आणि नायक जो श्रीकृष्ण त्याच्या निर्याणानें ध्वनित केला गेला आहे. 'Purpose'-चा पल्ला वस्तुत: इतका दूरचा लांब आहे; पण लेखारंभीं दिलेल्या अवतरणांत भीष्म म्हणतात त्याप्रमाणें आपली दृष्टि ' Purpose ' पेक्षां ' Use ' कडे जास्त असते. अर्जुन, द्रोणाचार्य आणि एकलव्य हे आपल्या धनुर्विद्येचा **उपयोग** कशा प्रकारें करतात यावरून आपण तर्क करतों कीं, त्यांचा उद्देश असा असावा आणि तसा असावा म्हणून; परंतु या साऱ्याचें अंतिम ' **प्रयोजन** ' या जीवन-नाटकाचा नायकच जाणे ! भीष्मासारखा ज्ञानीसुद्धां त्याचा अंदाज बांधूं शकत नाहीं आणि द्रोण हे तर कांहीं अंशीं गांगरूनच जातात. तरीसुद्धां आपल्या उपाध्याय-वृत्तीच्या बळावर ते कुणाचें जीवन उच्च आणि कुणाचें जीवन नीच याच्या मोजामापाकरितां कांहीं गमक सुचवितात. खरा ' **कार्मी** ' कोण ? स्वार्थाकरितां कर्म करणारा ? कीं कर्माकरितां कर्म करणारा ? कीं परार्थाकरितां कर्म करणारा ?-या दृष्टीनें पाहतां, स्वार्थी अधम ठरतो व परार्थी उत्तम ठरतो. आणि अशा या दोन शिष्यांचे गुरु द्रोणाचार्य स्वत: कर्माकरितां कर्म करणारे म्हणून मध्यम ठरतात. कर्माकडे








पाहण्याच्या या धोरणामुळें ' The Purpose' च्या या दोनच अंकांना एक प्रकारची पूर्णता आली आहे. खरें पाहिलें तर ' The Purpose ' चे दोन अंक, ' Fulfilment ' चा तिसरा अंक यानंतर एकदम ' Expiation ' चा अखेरचा अंक येऊं शकणार नाहीं. भीष्म शरपंजरीं पडला असतांनाची ती एक रात्र हा आणखी एका म्हणजे चौथ्या अंकाचा विषय व्हावा लागेल. आणि कैलासम् असेंहि एक नाटक लिहिणार होते, असें सांगितलें जातें. असो. सध्यां आपलें कर्तव्य ' The Purpose ' च्या दोन अंकांशींच आहे.

आधीं सांगितलेंच आहे कीं, ' प्र यो ज न ' नाटकांतील कथा व्यासांच्या कथेहून स्वरूपतः भिन्न आहे. कार्यतः ती तत्सदृश दिसते खरी. याचें कारण म्हणजे एकलव्य अंगुष्ठप्रदान करतो व पार्थ श्रेष्ठ धनुर्धर ठरतो हें होय. पण एकलव्यावर अन्याय झाला अशी जी भावना व्यासांच्या कथेंतहि शिल्लक राहते त्या भावनेंतील सहानुभूतीच्या बीजाला कैलासम् यांच्या या नाटकासारखा अंकुर फुटूं शकतो. मोरोपंतांनीं आपल्या ' आर्या–भारतां 'त ( आदिपर्व, अ. २४. ४७–४९ ) याच प्रसंगाला उद्देशून असे उद्गार काढले आहेत :

" जों गुरु म्हणे, ' मदिष्ट
प्रतिपादूनि स्ववाक्य साच करीं ' ।
तोंचि छेदुनि घे तो
स्वांगुळ व्याळदष्टसाच करीं ॥
साहे छळ आनंदें,
वाहे अंगुष्ठ, वरि न तो पाहे ।
राहे उगाचि, जाणों
देउनि अत्यल्प लाजला आहे ॥
केली सत्कीर्ति दुणी
झाली संधानशीघ्रताचि उणी ।
तो काय घात म्हणती ?
कीर्तिविघातासि आत्मघात गुणी ॥ "

या दृष्टीनें एकलव्य–माहात्म्याचें सूत्र धरून या कथानकाची जी नवीन रचना करतां येते, ती कैलासम् यांनीं केली आहे.

नाटककारांची ही प्रथा जुनीच आहे. पूर्वीं भास–कालिदासांनीं हा धडा घालून दिला. त्याचप्रमाणें कर्नाटकांतील जैन कवींनींहि आपल्या महाकाव्यांतून अर्जुनाहून कर्णाचें, भीमाहून दुर्योधनाचें, लक्ष्मणाहून रावणाचें (–जैन रामायणांत रावणाला मारणारा लक्ष्मण आहे, राम नव्हे !–) पात्र अधिक सहानुभूतीनें आणि जास्त उदात्ततेनें रंगविलें आहे. इंग्रजी अमदानीबरोबर आलेली इंग्रजांची शिक्षण-पद्धति व त्या शिक्षणपद्धतीबरोबर आलेली पाश्चात्त्य संस्कृति यांच्या निमित्तानें ग्रीक नाटकांचें जें दर्शन घडलें व त्या नाटकांतील आणि विशेषतः ट्रॅजेडींतील नायकांविषयीं ज्या नवीन विचारधारा वाहूं लागल्या त्यांचा परिणाम असा झाला कीं, पडत्याची बाजू उचलून धरून पतितोद्धाराचें श्रेय घेण्याची नवीन ' टूम ' निघाली. कर्नाटकचा आणि ग्रीसचा व्यापारी संबंध फार जुना आहे. त्यामुळेंच जणुं एका जुन्या ग्रीक प्रहसनांत एका पात्राच्या तोंडीं कानडी भाषा वापरली आहे हा शोध डॉ. होल्श यांनीं फार पूर्वीं लावला. अलीकडे बी. एम्. श्रीकंठय्या यांनीं रत्नकवीच्या ' गदायुद्ध ' या काव्याच्या आधारें जें एक नाटक लिहिलें आहे त्यांत त्यांनीं दुर्योधनाला भीमाहून वरचढ करून ठेविलें आहे. त्यांनीं स्वतः दुसऱ्या एका ग्रीक नाटकाचा अनुवाद केला त्यांत महाभारताचें कथानक वापरून चिरंजीवी अश्वत्थाम्याकडून आत्महत्या करवून रूढ विचारांना धक्का दिला ! स्वतः कैलासम् यांचें ' की च क ' नांवाचें नाटक अलीकडे प्रसिद्ध झालें आहे. त्यांत कीचक उत्तम प्रतीचा रसिक, एवढेंच काय, तो भला सज्जनहि होता, पण त्याचें दैव खोटें होतें आणि त्या अदृष्टानें त्याचा बळी घेतला असें रंगविलें आहे. स्व. रवींद्रनाथ ठाकूर यांनीं वाल्मीकींनीं उपेक्षिलेल्या ऊर्मिलेचें चित्र रंगविलें आणि त्याचा अवतार कानडींत सौ राजम्मा ( ' भारती ' या कवयित्री ) यांनीं रचिलेल्या ' तपस्विनी ' नाटकांत झाला. याप्रमाणें जुन्या कथानकाला नवें वळण देण्याची ही प्रथा फार जुनी आहे. म्हणूनच या चळवळीच्या पार्श्वभूमीवर कैलासम् यांच्या ' एकलव्या 'चा विचार करावा लागेल.



अनुक्रमणिका






## ‘ प्रयोजन ’ नाटकाविषयीं कांहीं विचार

### विपर्यस्त समाजमूल्यांवर कडाडून हल्ला

या सर्वांपेक्षां आणखी लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे कैलासम् ज्या म्हैसूर-कर्नाटकांतील समाजांत लहानाचे मोठे झाले तेथें जीवनमूल्या-विषयीं दृष्टि विपर्यस्त झाली आहे असें त्यांना दिसून आलें. कैलासम् यांचें स्वतःचें घराणें मोठें विद्वानांचें. त्यांचे वडील परमशिव अय्यर यांनीं रामायणांतील लंकेविषयीं एक ग्रंथ लिहिला आहे आणि ऋग्वेदांतील ऋचांतून भूगर्भज्ञान भरलें आहे असें ‘ Riks ’ या आपल्या ग्रंथांत प्रतिपादन केलें आहे. या ग्रंथाचा उल्लेख श्री. अरविंद आपल्या ‘ वेदसमीक्षे ’त करतात. कैलासम् यांचे चुलते टी. सदाशिव अय्यर हे मोठे संस्कृत पंडित होते व मद्रास प्रांतांतील एक विद्वान् न्यायाधीश म्हणून त्यांची ख्याति होती. स्वतः कैलासम् यांनीं शिक्षणाकरितां विलायतचा प्रवास केला होता. परत येतांना तेथून भूगर्भशास्त्राच्या अभ्यासाबरोबर जीवनविषयक एक निराळीच दृष्टि आपल्याबरोबर त्यांनीं आणली. त्या वेळीं त्यांना आपल्या सभोंवतालच्या समाजांत जर कांहीं दिसलें असेल तर तें हें कीं, पुस्तकी विद्येच्या पढिक विद्वानाला प्रथम मान्यता मिळते आणि समाजोपयोगी साध्या माणसाची आबाळ होते ! या परिस्थितीमुळें त्यांच्या जीवनदृष्टीला आव्हान मिळालें. त्यांतूनच त्यांचें पहिलें सामाजिक नाटक ‘ टोळ्ळु गट्टी ’ ( पोकळ आणि भरीव ) हें प्रकट झालें. पोकळ कोण ? भरीव कोण ?–इंग्रजी राजवटींत ‘ फर्स्ट क्लास फर्स्ट ’ येणाऱ्या माणसाला मोठी मागणी होती आणि परीक्षेंत ‘ फेल ’ होणें म्हणजे नरकवासाप्रमाणें वाटत असे. परंतु ही ‘ फर्स्ट क्लास फर्स्ट ’ मंडळी अधिकारप्राप्तीनंतर बेदरकारपणें चैनींत राहत आणि त्यांची समाजसेवेची दृष्टि फिकी, मलिन होई ! याचा परिणाम मात्र असा होई कीं, कांहीं अधिकारी कुटुंबें पोकळ असूनहि वरिष्ठ वाटत आणि समाजसेवेची सहज कळकळ असणारा खरा भरीव माणूस पोरसवदा वाटे ! कैलासम् यांना दिसलें कीं, आपली शिक्षणपद्धति बिघडली आहे. जीवन बिघडलें, तर आरोग्यप्रदान करण्याकरितां कलेनें जीवनाजवळ धांव घेतली पाहिजे. त्याऐवजीं कलाहि बेफिकीर आणि रंगेल बनली म्हणजे जीवन असह्य होतें. कैलासम् यांच्या जीवाचा ओढा नाट्यकलेकडे होता. रामायण व महाभारत यांनीं त्यांना बाळकडू पाजलें होतें. ग्रीक नाटकांनीं आणि आंग्ल-रंगभूमीनें त्यांची दृष्टि पाजळली होती. आपल्या सभोंवतालच्या समाजाचें निरीक्षण कैलासम् यांनीं अत्यंत सहानुभूतीनें, अगदीं सहव्यथेनें केलेलें होतें. आणि दैवानें त्यांना तशांत घराबाहेर काढलें, अधिकारांतून मुक्त केलें, देशभर वणवण भटकायला लावलें ! कैलासम् यांच्या जीवनाचें अधिष्ठान आणि त्यांच्या दैवाची प्रेरणा ही अशी होती. त्यांची बुद्धि हास्यांत उकळली होती. हृदय कारुण्यानें ओथंबलेलें होतें. आणि या दोन रसांच्या मदतीला त्यांच्या नवनवोन्मेषशालिनी प्रज्ञेनें अद्‌भुताचें दान केलें होतें. यामुळें त्यांनीं कानडी रंगभूमीला कांहीं प्रहसनें देऊन त्या समाजाला आपण किती हास्यास्पद जीवन व्यतीत करीत आहोंत याची जाणीव करून दिली. तसेंच कैलासम् यांनीं कांहीं शोकांतिका लिहून दुष्ट वासनांनीं लिंपलेल्या हृदयावर शस्त्रक्रिया करून, त्यांतील खऱ्या अंतःकरणाचें दर्शन घडविलें. म्हैसूर संस्थानचा मद्रास इलाख्याशीं पूर्वीं घनिष्ठ संबंध असल्यामुळें व रीजन्सीच्या कारभारामुळें, इंग्रजी भाषेलाहि मोठी प्रतिष्ठा प्राप्त झाली होती. कैलासम् यांनीं त्याचा फायदा घेऊन आपलीं इंग्रजी नाटकें त्या इंग्रजीप्रेमी बुद्धिवानांच्या श्रवणीं घातलीं. असें श्रवण केलेल्या बुद्धिवानांत (त्या वेळचे नुसते प्रोफेसर) राधाकृष्णन् , प्रसिद्ध थिऑसॉफिस्ट कवि व शिक्षणतज्ज्ञ म्हणून नांवाजलेले कझिन्स आणि अतिविद्वान् म्हणून प्रख्यात झालेले सी. आर. रेड्डी यांची गणना होते. मग इतर बुद्धिवानांची काय कथा? याच वेळीं म. गांधींच्या राजकीय आणि सामाजिक चळवळीमुळें जीवनसंघर्षांत सातहि रंग उमटले होते. आर्य-द्राविड, हिंदु-मुसलमान, स्पृश्यास्पृश्य, ब्राह्मण-ब्राह्मणेतर, काळा-गोरा व श्रीमंत आणि गरीब या सर्व द्वंद्वांना एक विलक्षण लज्जत आली होती. त्यामुळें दुर्दैवानें उपेक्षिलेल्यांच्या पुरुषार्थाचा कैवार घेणाऱ्यास एक प्रकारचें महत्त्व आलें होतें. या प्रतिष्ठेच्या भूमिकेवरून नाटककार कैलासम्









यांनीं वीराप्रमाणें आपलीं एकावर एक नाटकें अस्त्राप्रमाणें समाजावर फेंकलीं !

## एकलव्यविषयक नाटकरत्नाचे पैलू

कैलासम् यांनीं ' एकलव्य ' या नाटकरत्नाला पाडलेले नवीन पैलू कोणते हें पाहणें उद्‌बोधक होईल. एकलव्य हा निषादपति हिरण्यधनूचा मुलगा. खरें पाहिलें तर निषाद हे चातुर्वर्ण्यांबरोबर पांचव्या वर्णांत गणले जातात. शिवाय एकलव्य हा नुसता निषाद नव्हता. तो निषादांचा राजा होता. क्षात्रकर्म त्याच्या अधिकारांतलें होतें. म्हणून तर तो इतर राजपुत्रांप्रमाणें द्रोणाचार्यांकडे विद्यादान मागण्याकरितां गेला. आणि द्रोणांनीं त्याला शिष्य म्हणून जें स्वीकारलें नाहीं, त्याचें कारण तो केवळ निषाद होता हें नसून भीष्मांनीं त्यांना कुरु-पांडवांचे आचार्य म्हणून योजिलें होतें हें होय. द्रोणाचार्यांनीं त्याला शिष्य म्हणून जरी स्वीकारलें नाहीं तरी त्याची फारच प्रेमळपणानें बोळवण केली. ते म्हणाले :

" शिष्योऽसि मम नैषादे प्रयोगे बलवत्तरः ।
निवर्तस्व गृहानेव अनुज्ञातोऽसि नित्यशः ।।"

म्हणून तर, पुढील श्लोकांत वर्णिलेल्या

" स तु द्रोणस्य शिरसा पादौ गृह्य परंतपः ।
अरण्यमनुसंप्राप्य कृत्वा द्रोणं महीमयम् ।
तस्मिन् आचार्यवृत्तिं च परमामास्थितस्तदा ।।
इष्वस्त्रे योगमातस्थे परं नियममास्थितः ।
परया श्रद्धयोपेतो योगेन परमेण च ।
विमोक्षदानसंधाने लघुत्वं परमाप सः ।। "

अशा गोष्टी घडूं शकल्या ! याच प्रसंगाला अनुलक्षून मोरोपंतांनीं लिहिलें आहे :

" सर्वत्र समें सदयें
गुरुनें त्या मात्र एकलव्याला ।
केलें नाहीं, जैसे
विधिनें श्रुतिपात्र एकलव्याला ।।
गुरुनें आश्रय न दिला
परि तो नैषादि न विटला चित्तीं ।
जों जों दुर्लभ तों तों
सस्पृह वित्तेच्छु होतसे वित्तीं ।।
जाउनि वनांत मृण्मय
गुरु करुनि, धरुनि भावसारा धी ।
ताराधीशचकोरन्यायें
तो साधु त्यासि आराधी ।।
पुरवी इष्ट सकलहि
न गुरुध्यान प्रभाव नाचारी ।
इच्छा फळें न तैसीं
कल्पलता जेंवि भावना चारी ।।
जें तो मृण्मय गुरु दे
सत्यहि गुरु दे न अर्जुना फळ तें ।
तद्भावचि सद्‌गुरु पटु
धन्य कराया जना, असें कळतें ।।

—( आदिपर्व, अ. २४. २३-२७ )

एकलव्य हा निषादपति असल्यामुळें त्याच्यांत निषादाचे गुण अत्युत्कटतेनें असतील अशी जी कल्पना सहसा होऊं शकते, ती एकलव्यापुरती तरी निखालस खोटी ठरते...अशा प्रकारच्या नवीनच भूमिकेवर कैलासम् यांनीं आपल्या या नायकाची प्रतिष्ठापना केली आहे. मूळ भारतांत एकलव्यांत हा गुण होता किंवा नव्हता हें सांगण्याचा प्रसंगच येत नाहीं. कैलासम् यांचा एकलव्य म्हणतो—" Sir, ever since father was killed, mother and I live in a lone forest and though it is full of birds, deer and fawns...we live upon grains, milk and fruit. " मला वाटतें कैलासम् यांचा अर्जुन खास मांसाहारी आहे यांत संशय नाहीं. पण त्यांचा एकलव्य मात्र व्रतबद्ध होऊन निर्भेळ शाकाहारी बनला आहे. आतां हा शाकाहारी निषादांचा राजा द्रोणाकडे धनुर्विद्या शिकायला आला कशाला ? तो तर द्रोणांना म्हणतो—

" आपल्याला वाटतें का कीं, मी निषाद आहें तेव्हां आपण शिकविलेल्या धनुर्विद्येचा उपयोग मी गोरगरिबांची लूटमार करायला व निष्पाप प्राण्यांची हत्या करायला करीन म्हणून ! नाहीं ! "

एकलव्य हा पुराणकाळांतील एक महात्मा आहे. एवढेंच कीं, त्याला दैवानें निषादांच्या राजकुलांत जन्म दिला. परंतु त्याचें दुर्दैव हें कीं, एकलव्याच्या लहानपणींच त्याचा बाप हिरण्यधनु आपल्या राजाकरितां धर्मयुद्ध करीत असतांना रणांगणीं कामास आला. त्याच्या वडिलांनीं त्याच्यांत आपलें सत्यव्रतहि












चांगलें उतरविलें होतें. एकलव्य अर्जुनाला दुसऱ्या अंकांत म्हणत आहे : “ The very worst thing that one man says of another man is to call him a liar ”. एकलव्य अहिंसक आहे, सत्यप्रेमी आहे आणि मातृभक्त आहे. उपनिषत्कालांतील सत्यव्रत जाबालासारख्याच्या मातृभक्तीचें महत्त्व आपण जाणतोंच. त्याला आपली माता देवता आहे गुरु आहे, एवढेंच नव्हे तर मातृत्वाविषयीं त्याला परम आदर आहे. जेव्हां अर्जुन एकलव्याला अनृतवादी म्हणतो तेव्हां एकलव्य त्याला उलट उत्तर देतो कीं, खऱ्या सत्यवाद्याला जर कोणी अनृतवादी म्हटलें तर त्या स त्य वा द्या नें त्याला ठार केलें पाहिजे. पण ए क ल व्या ची मा तृ भ क्ति इतकी जबर कीं, जगांतील कोणत्याहि मातेच्या हृदयाला आपण दुःख देतां कामा नये असें त्याला वाटतें : “ But my mother always warns me to remember before I kill any one that his mother will not be sorry to lose him as my mother will be sorry to lose me. Have you a mother ? ”—म्हणूनच अर्जुन बचावतो. एकलव्याचा आणखी एक महासद्गुण म्हणजे निर्भयता ही काय चीज आहे हें तो जाणत होता. तो सांगतो, “One tells an untruth only when one is afraid of the truth. ” असें सांगण्यापूर्वीं मात्र बऱ्याच आधीं एकलव्यानें अर्जुनाला बजाविलें आहे कीं, “ Hate is only another name for fear.” म्हणजेच एकलव्य जवळजवळ ‘ अद्वेष्टा सर्वभूतानां ’ या जातीचा होता. त्याची गुरुभक्ति तर अशी अद्वितीय होती कीं, तीमुळें अर्जुन त्याच्यासमोर कःपदार्थ वाटतो आणि स्वतः त्याचा गुरु द्रोणाचार्य तर चीतच होतो ! व्यासांच्या भारतांतल्याप्रमाणें कैलासम् यांच्या या ‘ प्र यो ज न ’ नाटकांतील द्रोणाचार्य—

“ यदि शिष्योऽसि मे वीर वेतनं दीयतां मम। ”

असें किंवा—“ त्वयांगुष्ठो दक्षिणा दीयताम् ” असें म्हणत नाहींत. यामुळें मूळच्या द्रोणाचार्यांहून या नाटकांतील द्रोणाचार्य उदात्त बनले आहेत. याशिवाय व्यासांच्या द्रोणाचार्यांप्रमाणें येथील द्रोणाचार्य शिष्यांना विद्या शिकविण्यापूर्वीं—

“ कार्यं मे कांक्षितं किंचित् हृदि संपरिवर्तते।
कृतास्त्रैस्तत्प्रदेयं मे... ”

अशीहि शर्त घालीत नाहीं. त्यामुळें एकलव्याच्या अंगुष्ठप्रदानाला गुरुभक्तीचा कडेलोट असें म्हणणें प्राप्त होतें. कैलासम् यांचा एकलव्य हा एक नायकरत्न आहे. त्याच्या सद्गुणाचे पैलू अनेक आहेत. यामुळें अर्जुन ‘ प्र यो ज न ’ नाटकांत फार फिका पडतो. एकलव्याचें हें स्वरूप इतकें नवीन आहे कीं, तो केवळ कैलासम् यांचीच सृष्टि म्हणतां येईल.

### अर्जुनाचा प्रतिपक्षी एकलव्य

अशी पात्रसृष्टि निर्माण करण्याचा अधिकार नाटककाराला आहे काय ? आणि असें करण्याचें प्रयोजन तरी काय ? अतिपरिचयामुळें महात्म्यांच्या चरित्रांतून बोध घेतां येईनासें झालें म्हणजे चमत्कृतीनें त्यांचें चारित्र्यच बदलावें लागतें. आणि जीवाच्या जडमूढ बुद्धीला धक्का देऊन श्रेयोबोधाच्या आविष्काराकरितां, आत्मशोध करण्यास प्रवृत्त करावें लागतें. अशा या भावमंथनांतून एकलव्यासारखीं रत्नें निघतात. तेव्हां प्रश्न जो निर्माण होतो तो हा कीं हें ऐतिहासिक सत्य असेल का ? व्यासांची कथा खरी कीं कैलासम् यांचें नाटक खरें, हा नव्हे. या नाटकांत रंगविल्याप्रमाणें मूळ गोष्ट आहे असें कबूल करूनच प्रेक्षकाला आपल्या साक्षित्वाला पुढें करावें लागतें आणि आविष्कृत सत्याचा साक्षात्कार करून घ्यावा लागतो. आपण ‘ ( ‘ willing suspension of disbelief ) ’ —आपखुषीनें नसत्या अश्रद्धेला दूर सारून नाट्यकृति पाहावी लागते. ‘ प्रयोजन ’ नाटकाचा खरा नायक कोण ? अर्जुन कीं एकलव्य ? नाट्यांत मांडलेली गोष्ट प्रधानतः अर्जुनाची कीं एकलव्याची ? कीं अर्जुन आणि एकलव्य यांच्या स्पर्धेची ? या स्पर्धेंत हरला कोण ? आणि कुणाला खरा जय मिळाला ? नाटकांतील खरा फलयोग कोणता ? कोणाचें जीवन सफल झालें आणि कोणाचें विफल झालें ? जीवनाच्या सफलतेचा आणि विफलतेचा खरा निकष कोणता ?—‘बहुरत्ना वसुंधरा’ खरी, परंतु अनेकांचे अनेक गुण ओळखून त्यांची

योग्य योजना करणारा मिळणें फार दुर्घट आहे. जीवनाचें खरें प्रयोजन काय हें हृदयानें जाणून आणि त्या बुद्धीनें 'त्रैगुण्योद्भव लोकचरिता'चा खेळ जो खेळूं शकतो व खेळवूं शकतो तो खरा नट आणि तो खरा नाटककार. हें नाटक या अर्थानें जो पाहूं शकतो तो खरा प्रेक्षक आणि हा अर्थ दुसऱ्यांत बिंबवूं शकतो तो खरा समीक्षक. अशा या चतुरंग सिद्धीनें जो रंगभूमि सजवूं शकतो तो खरा दिग्दर्शक, तो खरा सूत्रधार. कैलासम् यांच्यांत या गुणांचा अपूर्व मिलाफ होता म्हणून तर त्यांच्या वावटळीसारख्या जीवनांतूनहि अनेक दृश्यें दृगोचर होऊं शकलीं आणि आकाशभाषितें नाट्यरूपानें अवतरलीं. कैलासम् यांनीं जीवनाचा पट उघळून टाकला होता. आपल्या सामाजिक जीवनाची घडी परत कशी बसेल, समाजाला जिवंत दृष्टि कशी येईल, याची त्यांना विवंचना लागली होती. त्या विवंचनेचें फळ म्हणजेच हीं नाटकें. 'फर्स्ट क्लास फर्स्ट' येणाऱ्या अधिकारारूढ पंडितांमुळें सामाजिक सौजन्य नष्ट झालें आहे असें कैलासम् यांना दिसूं लागलें. त्यांनीं आपल्या पहिल्याच नाटकांत फर्स्ट क्लास फर्स्ट येणारा 'पुट्टु' केवळ पोकळ नगारा आहे आणि सर्वांना उपयोगी पडणारा पण नापास हा शिक्का पडलेला 'माधु' लोकहितदृष्टीनें भरीव नग आहे असें मांडून म्हैसूरमधील कर्नाटक-समाजाला विचारप्रवृत्त केलें.

या 'प्रयोजन'नाटकांत तेंच वाण नव्या ढंगांत आलें आहे. देवाचा लाडका जो अर्जुन त्याची शेखी बस् झाली, त्याच्या प्रतिपक्षांत कांहीं गुण आहेत का हें पाहूं या तरी म्हणून कैलासम् प्रवृत्त झाले! एकलव्याच्या या कथेंत कैलासम् यांना तें बीज सांपडलें. आणि त्या बीजाचें रोप म्हणजेच हें 'प्र यो ज न' नाटक. असें करतांना कैलासम् यांनीं व्यासांना वाट पुसतच आपला मार्ग चोखाळला आहे :

> " जरासंधश्चेदिराजो महात्मा
> महाबाहुश्चैकलव्यो निषादः।
> एकैकदेशे निहताः सर्व एते
> योगैस्तैस्तैस्त्वद्धितार्थं मयैव ।। "

असें व्यासांचें मूळ वाक्य आहे. शिवाय व्यासांनीं असेंहि म्हटलें आहे :

> " जरासंधश्चेदिराजो नैषादिश्च महाबलः।
> यदि स्युर्न हताः पूर्वमिदानीं स्युर्भयंकराः ।। "

एकलव्याचा उल्लेख जरासंध आणि शिशुपाल यांच्या बरोबर केलेला आहे. एकलव्य असामान्य माणूस आहे हें कबूल केलेंच पाहिजे. पण कोणी म्हणेल कीं, त्याचा उल्लेख दुष्टांच्या मालिकेंत केलेला आहे. परंतु दुष्ट या एका नांवानें प्रतिपक्षांतील सर्व गुणांचा संहार करून टाकणें हें सुजीवनवृद्धीला पोषक होत नाहीं. या संदर्भांत

> ' परगुणपरमाणून्पर्वतीकृत्य नित्यं
> निजहृदि विकसन्तः सन्ति सन्तः कियन्तः। '

हें जुनें सुभाषित बऱ्याच लोकांच्या स्मृतींत जागृत होईल. कैलासम् यांचेंहि एक सुभाषित असेंच आहे :

There is so much bad in the best of us
And so much good in the worst of us.
It ill behoves smuggest of us,
To speak aught ill of rest of us.

एकलव्याचा संहार श्रीकृष्णानें खास करविला असला पाहिजे. नाहीं तर एकलव्य अधर्मपक्षाला सामील झाला असता. पण एवढ्यामुळें एकलव्याच्या निर्व्याज गुरुभक्तींत प्रगट होणारें गुणमाहात्म्य खोटें ठरत नाहीं.

> एकलव्यस्तु तत् श्रुत्वा वचो द्रोणस्य दारुणम्।
> प्रतिज्ञामात्मनो रक्षन् **सत्येन नियतः सदा** ।।
> तथैव हृष्टवदनः तथैवादीनमानसः।
> छित्त्वाऽविचार्य तं प्रादात् द्रोणायाङ्गुष्ठमात्मनः ।।

या श्लोकांत वर्णिलेला एकलव्याचा सत्यपक्षपात, अंगुष्ठ देतांना न डगमगतां, मनानें दीन न होतां, तोंडावरील आनंद न मावळूं देतां स्थिर राहण्याचें त्याचें धैर्य, या गुणांची पूजा व्हायाला नको का? ती पूजा कैलासम् यांनीं या नाटकांत बांधली आहे. पण यामुळें अर्जुनाला अन्याय झाला नाहीं का हा प्रश्न उत्पन्न होईल. पण व्यासांनीं देखील या बाबतींत अर्जुनाला गौणत्व दिलें आहे. एकलव्यानें अंगुष्ठ दिल्यावर—

> " अर्जुनः प्रीतमना बभूव विगतज्वरः। "

असें व्यासांनीं म्हटलें आहे. केवळ या आख्याना-







पुरतें पाहिल्यास व्यासांच्या मतेंहि अर्जुन नीरस ठरतो व एकलव्य सरस ठरतो.

हें नाटक कैलासम् यांनीं रंगवितांना जीवनांतील 'Purpose' चा निकष सुचविला आहे. वीर कोण आणि कोण नव्हे हें त्याच्या Purpose-च्या उत्कृष्टतेवर अवलंबून आहे. हा निकष चारित्र्याला लावून द्रोणाचार्य अर्जुनाला टासून सांगत आहेत कीं, "बाबारे, तूं स्वार्थी असल्यामुळें तूं अधम कार्मी आहेस. एकलव्य परार्थाकरितां विद्यासंपादन करीत आहे, म्हणून तो उत्तम कार्मी आहे." एकलव्य सांगतो: "आपण निषाद आहोंत हें खरें, आर्य आपल्याहून श्रेष्ठ हेंहि खरें. कां? तर ते आपल्या हरिणांचें संरक्षण अहिंसेनें करूं शकतात. त्यांच्या आश्रमांतून हरिण आणि लांडगे गुण्यागोविंदानें राहतात. आपल्याजवळ ती तपःशक्ति नाहीं. मग आपल्या प्रदेशांतील निष्पाप मुग्ध हरिणांचें लांडग्यांपासून संरक्षण कसें होणार?"–त्याच्या आईनें त्याला सांगितलें, म्हणे: "You can, in this life of yours, protect your deer and fawns as befits your caste by slaying the wolves... and you will be storing tapas. Well Rakshaayoga, she called it sir." कालिदासानेंसुद्धां सांगितलें आहे कीं 'आर्तत्राण' हें क्षत्रियांचें कर्तव्य आहे. 'शाकुतन्ला'च्या दुसऱ्या अंकांत ऋषिकुमार सांगतात:

"**रक्षायोगात्**अयमपि तपः प्रत्यहं संचिनोति।"

राजा दुष्यन्त ज्या रक्षायोगाच्या बलानें तपःसंचय करीत होता, त्याच रक्षायोगाचा उपदेश एकलव्याच्या आईनें त्याला केला.

एकलव्याच्या आईचें पात्र ही केवळ कैलासम् यांचीच अपूर्व सृष्टि आहे. हें पात्र एकदांहि रंगभूमीवर येत नाहीं. 'Fulfilment' मध्येंहि तें रंगभूमीवर येत नाहीं. एकलव्याच्या मातृभक्तींतूनच त्याची आई ही काय चीज आहे हें रम्य रीतीनें ध्वनित होतें. एकलव्याची मातृभक्ति आणि गुरुभक्ति या इतक्या उच्च प्रतीच्या आहेत कीं, अर्जुन लोकैकधनुर्धर म्हणून ठरला तरी तो एकलव्याच्या कीर्तीला धक्का पोहोंचूं शकत नाहीं. आपण लोकैकधनुर्धर म्हणवून घ्यावें हा अर्जुनाचा हट्ट या नाटकांत सफल होतो. त्या अर्थानें एकलव्य विफल होतो, हें खरें. पण खरा नायक कोण? 'प्र यो ज ना'-च्या पहिल्या अंकांत काय किंवा दुसऱ्या अंकांत काय, प्रेक्षकांच्या दृष्टीनें एकलव्यच विजयी ठरतो. फलयोगावरून नायकाचा उदात्तपणा ठरत नाहीं, तर त्याच्या कर्मचोदनेंतील ज्ञानाची जात आणि त्याच्या कर्मसंग्रहांतील कर्माचा आणि कर्त्याचा सात्त्विकपणा, राजसपणा अगर तामसपणा यांवर तो ठरतो. आपण श्रेष्ठ धनुर्धर म्हणवून घ्यावें हें अर्जुनाचें ज्ञान तामसी आहे. गीतेंत म्हटलेंच आहे:

यत्तु कृत्स्नवदेकस्मिन्कार्ये सक्तमहेतुकम्।
अतत्त्वार्थवदल्पंच तत्तामसमुदाहृतम्।

गीतें वर्णिल्याप्रमाणें एकलव्याची धृति उघड उघड राजस आहे.

यया तु धर्मकामार्थान् धृत्या धारयतेऽर्जुन।
प्रसंगेन फलाकांक्षी धृतिः सा पार्थ राजसी।

म्हणूनच अर्जुनाहून तिची जात उच्च आहे. पहिला नंबर पटकावण्याचें अर्जुनाचें वेड आणि त्याकरितां त्यानें केलेला हट्ट व छळ हा तामसी गुण आहे. एकलव्याला फलाकांक्षा आहे खरी. परंतु ती अनाथ हरिणांच्या रक्षणाविषयींची आहे. म्हणूनच ही परार्थ इच्छा अर्जुनाच्या तामसीपणापेक्षां वरिष्ठ दर्जाची आहे. यामुळें गुणदृष्टीनें एकलव्य नायक ठरतो आणि फलदृष्टीनें अर्जुन वरचढ होतो. हीच या जीवनांतील शोकान्तिका (tragedy) होय.

### ईश्वरी प्रयोजनाचें संसूचन

पण 'The Purpose' या नाटकाचा पल्ला पूर्वींच सांगितल्याप्रमाणें फार दूरचा आहे. केवळ अर्जुन-एकलव्यांच्या दृष्टीनें पाहिल्यास 'प्रयोजना'-च्या पहिल्या अंकांतील भीष्माचें भाषण तत्त्वज्ञानानें खचून भरलें असलें तरी औचित्याच्या दृष्टीनें तें कदाचित् अतिव्याप्त वाटल्याशिवाय राहणार नाहीं. 'Purpose'चा निकष एकलव्य, अर्जुन व द्रोण एवढ्यांनाच लागू नसून तो भीष्मांनाहि लागू आहे. त्या Purpose ची 'Fulfilment' (परिपूर्ति) कैलासम् हे भीष्मावर एक नाटक लिहून दाखविणार होते.









अनुक्रमणिका

एकलव्याच्या ‘ Purpose ’ ची परिपूर्ति ( Fulfilment ) कांहीं वेगळ्याच रीतीनें ‘ Purpose ’ या दोन अंकी नाटकाच्या पुढील ‘ Fulfilment ’ या एकांकी नाटकांत होते. श्रीकृष्ण एकलव्याचा संहार करतो. “ माझ्या आईला माझ्या मरणामुळें दुःख होणार नाहीं असें घडवून आणावें ” या एकलव्याच्या प्रार्थनेप्रमाणें श्रीकृष्ण त्याच्या आईचाहि संहार करतो. अशा रीतीनें प्रत्यक्ष लोकक्षयकारी कालाचा आवेश संचारलेला श्रीकृष्ण शेवटीं स्वतः व्याधाच्या बाणाला बळी पडून यापुढील ‘ Expiation ’ ( प्रायश्चित्त ) या नाटकांत आपला अवतार आटोपतो. अशा प्रकारें कर्म-फलाच्या शृंखलेंतून ईश्वरी प्रयोजनाचें आणि योजनेचें महानाटक दाखवून कैलासम् प्रेक्षकांच्या साक्षित्वास जागें करतात. द्रष्टा नाटककार विशुद्ध दर्शनज्ञानाहून वेगळी अशी मोठी देणगी काय देणार ? या देणगीचा एक हप्ता ‘ प्रयोजनां ’त आला आहे. ही देणगी फार मोठी आहे. शिक्षण-सूत्र, प्रयोजनाचा निकष, या साऱ्या नाटकी युक्त्या आहेत. मलिन झालेल्या बोधाला शुद्धीवर आणणें झाल्यास असें कांहीं करावें लागतें. कोणा समीक्षकानें म्हटलें आहे कीं, ‘ प्र यो ज न ’ या नाटकांत कैलासम् यांनीं एकलव्याकडून अर्जुनाची त्रेधा उडवून सनातनी विचारांना चपेटा दिला आहे ! परंतु असल्या समीक्षेनें जुन्या जखमा चिघळतात. असलेंच उचनीचतेचें चर्वितचर्वण करणें झाल्यास नवीं नाटकें पाहिजेत तरी कशाला ?

> सन्तः परीक्ष्यान्यतरद्भजन्ते
>
> मूढः परप्रत्ययनेयबुद्धिः ।

अस्सल मूढपणावर नाटकाची मात्रा किती चालते हें प्रयोगानंतरच कळेल. अनेक समीक्षणां-च्या मंथनानें जें नवनीत निघेल त्यांत खरी गोडी असते. असें मंथन प्रत्येक वाचक-प्रेक्षकानें करावें आणि तशी गोडी प्रत्येक रासिकानें चाखावी.

‘ The Purpose ’ चें प्रयोजनक्षेत्र ‘ प्र यो ज न ’ या भाषांतरानें वाढलें आहे. श्री. के. ना. काळे यांचें भाषांतर सरस आणि ओजस्वी आहे. महाराष्ट्र-जनता नाटकप्रिय आहे. या नाटकामुळें महाराष्ट्रांतील बुद्धिवादी पण रसिक मंडळी या नाटकाच्या प्रयोजनांतून जीवनाच्या प्रयोजनाकडे वळतील आणि असा प्रश्न टाकतील कीं, “ जीवनाचें प्रयोजन काय ? कलेचें, नाट्य-कलेचें प्रयोजन काय ? आणि असल्या समीक्षेचें प्रयोजन काय ? ”

‘ प्रयोजनमनुद्दिश्य न मन्दोऽपि प्रवर्तते । ’ असें मूर्खालाहि वाटतें–पण खरी जीवनप्रवर्तक समीक्षा ही थट्टा नव्हे. ‘ केनेषितं पतति प्रेषितं मनः ’ असा प्रश्न सुचवून ‘ अन्यदेव तद्विदितादथो अविदिता-दधि । इति शुश्रुम पूर्वेषां ये नस्तद्व्याचचक्षिरे । ’ असें ऋषि उत्तर देत असतात. म्हणून जीवनाच्या कूट प्रश्नाला आपल्याजवळ हमखास उत्तर आहे असें म्हणणें धिटाईचें होईल ! पण कैलासम् यांनीं आपल्या या नाटकानें त्या जिज्ञासेला चेतविलें आणि त्यामुळें म्हैसूरचे महाकवि के. व्ही. पुट्टप्पा यांनीं ‘ बेरळिगे कोरळु ’ (‘ आंगठ्याचा बदला गळा ’) हें नाटक लिहिलें. अन्यायानें आंगठा घेतला तर द्रोणांना त्याच्या बदलीं आपला गळा द्यावा लागला असा त्याचा ध्वनि आहे. कन्नडचे राष्ट्रकवि गोविंद पै यांनीं ‘हेब्बेरळु’–‘आंगठा’ हें नाटक ग्रीक नाटका-च्या वळणावर नेलें आहे, आणि दुसऱ्या कांहीं लेखकांनींहि या वस्तूचा उपयोग नाटकाकरितां केला आहे परंतु कैलासम् यांचें प्रस्तुत ‘ Purpose ’ पुढील इतर नाटकांसहित जर संपूर्ण नाटकचतुष्टय प्रसिद्ध झालें असतें तर याहून मोठी कामगिरी झाली असती. प्रत्येक जीवनांत कांहीं ‘ Purpose ’– ‘प्रयोजन’ आहेच. पण खरें ‘The Purpose’ तें महान् प्रयोजन जीवननाटकाच्या महानाटककारालाच माहीत असतें. आणि कालच त्याचा उलगडा करीत असतो.

‘The Purpose’चे हे दोन अंकहि विचारो-द्दीपक आणि भावनोद्दीपक आहेत. ‘ At the heart of the nature of things, there are always the dreams of youth and the harvest of tragedy ’ असें सुप्रसिद्ध तत्त्वज्ञ ए. एन्. व्हाइटहेड यांनीं आपल्या एका जीवनविमर्शात्मक ग्रंथांत म्हटलें आहे तें प्रस्तुत नाटकाला लागू आहे.



अनुक्रमणिका






## 'प्रयोजन' नाटकाविषयीं कांहीं विचार

जीवन-जिज्ञासा आणि नाट्यकला-जिज्ञासा साधक बनविते, याच समीक्षेची वाणी प्रस्तुत यांतून येणारी चतुरंगसमीक्षा प्रेक्षकास जीवनाचा 'प्र यो ज नां'त ध्वनित होते.[1]

---

[1] महान् नाटक प्रेक्षकास कोणत्या अर्थानें जीवनाचा साधक बनवितें याविषयीं पुढील उतारा वाचनीय आहे :

"Only idiots may be completelv happy. Reflection, sympathy, wisdom, gentleness, experience—the chords upon which great drama is played—these are wistful chords...The mission of a great drama is not to make numskulls glad that they are alive, but to make them speculate why they are permitted to be alive at all."

—'The Critic and the Drama' by G. J. Nathan

---

## कैलासम् : समाजाला आव्हान देणारा बंडखोर !

**कैलासम्** हे तरुण असतांना मी त्यांना पहिल्यांदा पाहिलें. मी त्या वेळेला अर्थात् लहान होतों. त्यांना पाहिल्यावर त्यांच्यासंबंधीं विलक्षण आदर व भयहि वाटे. त्यांच्या बोलण्यांतून, हालचालींतून एक प्रकारच्या बेदरकार, उच्छृंखळ स्वातंत्र्याचा साक्षात्कार होई. ते जणूं दंड ठोकून समाजाला आव्हान देत आहेत असें वाटे बंगलोरच्या रस्त्यावरून एखाद्या अवलिया फकिराप्रमाणें दिव्य तंद्री लागल्याप्रमाणें ते हिंडत. त्यांच्या अर्ध्या हाताच्या शर्टमधून उमटून दिसणारे त्यांचे उघडे पिळदार बाहू त्यांच्या तालीमबाज कमावलेल्या शरीराची साक्ष देत. आणि त्यांना आपल्या कणखर मनोबलाप्रमाणें आपल्या या कमावलेल्या शरीरबळाचा अभिमानहि वाटे. कित्येक वेळां तर ते एखाद्या पहिलवानाच्या ऐटीनें व आवेशानें दंड ठोकून दंडाचे स्नायू सहज लीलेनें फुगवून दाखवीत. "बघितलेंत !" दंड थोपटीत ते म्हणत "सर्व जगाशीं कुस्ती करायची माझी तयारी आहे !" आणि हे उद्गार काढतांना त्यांचे डोळे विलक्षण तेजानें चमकून उठत.—कैलासम् यांच्या साहित्यामुळें, त्यांचें नांव दक्षिण हिंदुस्थानांतून घरोघर गाजत होतें. त्याबरोबरच त्यांच्या विलक्षण विक्षिप्त, व्यक्तित्वामुळें, त्यांचें नांव उच्चारल्याबरोबर "कैलासम् श्रेष्ठ प्रतिभावन्त आहेत, पण— !" असें म्हणून लोक नाकहि मुरडीत.—आणि तें स्वाभाविकहि होतें. कारण कैलासम् यांनीं आपल्या प्रतिभेनें समाजाच्या झब्बूगिरीवर व दांभिकपणावर विदारक प्रकाशक टाकला होता, त्या समाजाचीं अंडींपिल्लीं बाहेर काढलीं होतीं !

—हरीन्द्र चट्टोपाध्याय ('आठवणीं'तून)









अनुक्रमणिका

श्री. मास्ति वेंकटेश अय्यंगार. अनु. प्रा. द. रा. वेन्द्रे

# कैलासम् यांचें व्यक्तिमत्त्व

कैलासम् यांना मी जवळ जवळ ३२ वर्षांपूर्वी पहिल्या प्रथम पहिलें. त्या पहिल्या भेटींतच, माझ्या लक्षांत आलेला त्यांचा मुख्य गुण म्हणजे त्यांची तल्लख बुद्धि. विषय कोणताहि असो त्याचें आकलन त्यांची बुद्धि वेगानें करी. त्यांची भावनाहि अशीच वेगवान् होती. त्यांची अनुभूति, त्यांचें उक्तिवैचित्र्य यांतहि तोच वेग अनुभवास येई. त्यानंतर, त्यांची पुनः भेट झाली तेव्हां माझ्या लक्षांत आलें कीं, जशी त्यांची बुद्धि वेगवती आहे, तसेंच त्यांचें हृदयहि अत्यंत आर्द्र आहे. तीक्ष्ण बुद्धीनें आणि आर्द्र हृदयानें त्यांनीं लोकजीवनाचें निरीक्षण केल्यामुळें त्यांच्यांत विलक्षण जिव्हाळा व मार्दव आलें होतें.

आपल्या भोंवतालच्या जीवनाचा चिचका पाहून कैलासम्सारखे सहृदय झुरतात, कारुण्यानें व्याकुळ होतात. आणि त्यांना तें अपरिहार्यच होय. कैलासम् यांच्या बोलण्या-चालण्यांत हें कारुण्य प्रतीत होत असे. उघड्या डोळ्यांनीं जीवनाकडे सांगोपांग पाहणाऱ्या त्यांच्या दृष्टीला जीवनाचें सर्वांगीण ज्ञान पुरेसें झालें होतें हेंहि लक्षांत येई. या त्यांच्या जीवनज्ञानाचें मुख्य लक्षण म्हणजे त्याचा विस्तार अथवा वैपुल्य नव्हे, तर त्या ज्ञानांतील भेदक कुशाग्रता, गाढपणा, सखोलपणा हें होय. कैलासम् यांचा आणखी एक गुण म्हणजे सरलता हा होय. रस्त्यावर भेटलांत तर रस्त्यावर, दुकानांत भेटलांत तर दुकानांत, जेथें भेटाल तेथें, कधीं आपल्या मित्रांना थांबवूनहि, वेळ काय झाला आणि किती गेला याचा बिलकुल संकोच न बाळगतां आपल्या अंतःकरणास इष्ट वाटतील त्या गोष्टी ते सांगत असत. आमचा परिचय दिवसेंदिवस वाढत गेला तसतसें त्यांचें हेंच चित्र अधिकच खुलून दिसूं लागलें. आपल्या 'कृती 'विषयीं, ती जणू दुसऱ्यांची आहे अशा निःस्पृह विश्वासानें, आणि अनहंकारानें ते गप्पा करीत असत. त्यांची सरलता, शाळूसोबतीपणाच्या दोषापासून अलिप्त असा त्यांचा स्नेह म्हणजे जणू निःसंकोच अद्वैतालिंगनच वाटे! माझ्या अनुभवफलकावर जी कैलासम् यांची मूर्ति कोरली आहे तिच्या जीवरेखा या अशा आहेत.

अशा या स्वभावाच्या आमच्या या मित्रांनीं 'टोळ्ळु गट्टि' ('पोकळ अन् भरीव') या नावानें प्रख्यात असलेलें छोटेखानी नाटक बत्तीस वर्षांपूर्वीं लिहिलें, आणि कानडी नाटकाचे सेवक म्हणून साहित्यांत पदार्पण केलें. 'टोळ्ळु गट्टि' ही खरोखर छोटीशी कृति आहे. तिची प्रस्तावना आणि इतर सर्व कांहीं धरूनहि ह्या नाटकाची लांबी एकूण ४८ पानें भरेल! परंतु अशा या छोट्या नाटकानें रंगभूमीवरील एका मोठ्या क्रांतीस प्रारंभ झाला. त्या वेळीं आमच्या म्हैसूर प्रांताच्या शिक्षणखात्याचे मुख्याधिकारी श्री. कट्टमंची रामलिंग रेड्डी (C. R. Reddi) यांनीं या नाटकाचा प्रयोग पाहून मोठ्या आनंदानें आणि आश्चर्यानें या नाटकाच्या कर्त्याची मुक्तकंठानें स्तुति केली. श्री. रेड्डी यांचा आंग्लसाहित्याचा अभ्यास चांगला गाढ होता. विलायतेस जाऊन, तेथें राहून तेथील आधुनिककालीन रंगभूमीची अद्भुत वाढ पाहून ते संतोषभरित झाले होते. तरीहि, किंबहुना त्याच कारणामुळें कैलासम् यांची ही छोटी नाट्यकृति पाहून ते मुग्ध झाले. आपल्या पौराणिक वळणाच्या जुन्या कादंबऱ्यांतून देशपर्यटन करणारा राजपुत्र पुष्करिणींत पाहिलेल्या एका केसावरून तेथें स्नान करून गेलेल्या स्त्रीच्या सौंदर्याची कल्पना करून

---

सुप्रसिद्ध श्रेष्ठ कन्नड साहित्यिक श्री. मास्ती वेंकटेश अय्यंगार यांनीं हा लेख मूळ कन्नडमधून लिहिलेला आहे. त्याचा प्रस्तुत मराठी अनुवाद प्रा. द. रा. वेन्द्रे यांनीं 'नवभारता 'करितां करून दिला याबद्दल त्यांस मनःपूर्वक धन्यवाद. —का. सं.






सोहित झाला अशीं वर्णनें येतात. लावण्यनिरीक्षकांना अशीच दृष्टि येत असते. श्री. रेड्डी यांनाहि हीच लावण्यदृष्टि होती. श्री. रेड्डी कैलासम् यांना 'Genius' म्हणाले, 'Jewel' म्हणाले. कैलासम्‌विषयीं योजलेलीं हीं दोन्हींहि विशेषणें किती सार्थ आणि उचित होतीं याची साक्ष कैलासम् यांनीं त्यानंतर लिहिलेल्या वाङ्मयकृतीवरून स्पष्ट होईल

## इब्सेन, शॉ यांचा परिणाम

पाश्चात्त्य साहित्यानें कानडी नवसाहित्याच्या इतर शाखांप्रमाणेंच नाट्यवाङ्मयशाखेंतहि नवीन मार्ग दाखविला आहे. समाजाचें चित्र रंगविणें, समाजाची 'टीका' करणें हें नाटकाचें काम; हा झाला जुना संप्रदाय. पण नव्या नाटकाचा विशेष गुण म्हणजे सामाजिक समस्यांची बौद्धिक चर्चा करणें हा होय. पाश्चात्त्य साहित्यांतील या पद्धतीचा पहिला आचार्य नॉर्वेचा इब्सेन् हा होऊन गेला. या महनीय साहित्यिकाचें 'The Doll's House' नांवाचें जें प्रसिद्ध नाटक आहे त्याचें भाषांतर माझे मित्र श्रीमान् सोसले गरळपुरि शास्त्री (S. G. Shastri) यांनीं कांहीं वर्षांपूर्वी केलें. त्या नाटकांतील 'नोरा' आपल्या गृहिणीपदाच्या नांदणुकीला विटली व घराबाहेर पडली. घराबाहेर पडतांना तिनें दार उघडून तें परत धाडकन् जें बंद केलें त्याचा पडसाद युरोपखंडभर दुमदुमला ! अशा त्या नाटकाचा महिमा वर्णितांना समीक्षकांनीं इब्सेनची चमत्कृतिपूर्ण स्तुति केली आहे. याच प्रकारचीं आणखी पांचदहा नाटकें रचून आपणच प्रारंभ केलेल्या संप्रदायास इब्सेननें प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. या पद्धतीप्रमाणें इंग्लंडमधें अनेकांनीं नाटकें लिहिलीं. तसल्या नाटककारांत अग्रगण्य म्हणजे बर्नार्ड शॉ हे होत. कैलासम् आपल्या विद्याभ्यासाकरितां इंग्लंडमध्यें असतांना या नवनाट्याची फार चलती होती. कैलासम्‌सारख्या उत्साही तरुणांना तें नवनाट्य फार मनमोहक वाटल्यास त्यांत आश्चर्य नाहीं. ते मायदेशास परत येऊन, साहित्यकार्य आपणहि कांहीं करावें असें त्यांना वाटतांच त्यांच्या बुद्धीनें सहजच इब्सेन् आणि बर्नार्ड शॉ यांची वाट धरली. अर्थात् असें म्हणण्यानें कैलासम् यांच्यांत स्वतंत्र बुद्धि नव्हती असें कोणीहि समजूं नये. उलट पक्षीं असें म्हणतां येईल कीं कैलासम् यांचा स्वभावच मुळीं निमुटपणें दुसऱ्यांचा मार्ग पत्करणाऱ्यांचा नव्हता, तर नवीन मार्ग निर्माण करणाऱ्यांचा होता. इब्सेन्‌मध्यें जी संपूर्ण वास्तवता दिसते तशी ती कैलासमच्या कृतींत नाहीं; वास्तवता त्यांना आवडत असूनहि इब्सेनच्या त्या मार्गाचा अवलंब करणें त्यांना जमलें नाहीं असें वाटतें. त्याचप्रमाणें बर्नार्ड शॉच्या रचनेंतून दृग्गोचर होणारा अवास्तवपणाहि कैलासम् यांच्यांत नाहीं. इब्सेनमध्यें हास्य-विनोद नाहीं. उलट, बर्नार्ड शॉ हा तर अस्सल विनोदनिपुण होता. कैलासम् यांचा कल वास्तवतेंत इब्सेन्‌कडे तर हास्यांत शॉकडे होता. पण एकंदरींत विचार करता कैलासम् यांचा मार्ग केवळ त्यांचाच एकमेव असा म्हटला पाहिजे. जनजीवनांतील आजच्या अनेक समस्या त्यांनीं लोकांसमोर मांडल्या आणि त्याविषयीं विचार करण्यास लोकांना अंकुशप्रयोगानेंहि जागें करण्यास मागेंपुढें पाहिलें नाहीं.

## सहानुभूतिपूर्ण मृदु हास्य

या जागृत करण्याच्या कार्यांत कैलासम् यांनीं योजिलेलें मुख्य साधन म्हणजे हास्य हें होय. त्यांच्या या हास्याचा प्रकारच कांहीं निराळा आहे. आतां हा प्रकार कसला हें सर्वंकषतेनें ठरविणें झाल्यास हास्याच्या इतर सर्व प्रकारांचें विवरण करावें लागेल. सध्यां तें न करतां कैलासम् यांच्या हास्य-विनोदाचीं मुख्य लक्षणेंच येथें दिग्दर्शित करतां येतील. माणसांची वागणूक सामान्यतः पाहिल्यास तशी सर्वसामान्यच दिसते. फारच निरखून पाहिल्यास वागणुकींतील कांहीं भाग विकृत दिसतो; आणि इतर कांहीं भाग तितकें न निरखतांनाहि हास्यास्पद वा हास्योत्पादक होतात. कैलासम् मानवी वागणुकीकडे मुद्दाम निरखून पाहून, दोषाविष्करण किंवा उपहास करीत नाहींत; तर जीवनाकडे पहात पहात सहजच हास्योद्दीपक होणारे प्रसंगच तेवढे नेमके उचलतात आणि आपण स्वतः हंसतात व दुसऱ्यांना हंसवितात. अर्थात् त्यांच्या दृष्टीला जें पडलें तें दुसऱ्यांना कदाचित् दिसणार नाहीं किंवा हास्योत्पादकहि










वाटणार नाहीं. म्हणूनच जणूं कैलासम् तो प्रसंग अतिरंजित करून दाखवितात. तसल्या अतिरंजित प्रसंगामुळें मात्र कसल्याहि स्थूल बुद्धीच्या माणसाला त्यांतील लज्जत किंवा हास्योत्पादकता खास कळून येते. मूळ सौंदर्याहून निराळा असा विकृतपणा पाहून आपल्याला हंसूं येतें. याचें कारण म्हणजे त्या विकृत वागणुकीचें मूळ कोणच्या तरी अविवेकांतून निष्पन्न झालेलें असतें. त्या अविवेकीपणाचें दर्शन होऊन आपणांस कळत नकळत, आपल्या वागणुकींत कमी-जास्त सुधारणा घडून येत असते. अशा वेळीं कैलासम्‌सारख्या महान् कवीचें काम हें कीं तो त्या दोषाचें दर्शन करून देतांना तो तें जणूं लहानाचें मोठें करून दाखविणाऱ्या आरशांतून करवतो व हंसवितो. कवीचें हृदय आर्द्र नसल्यास असल्या हास्याची परिणति अट्टहास, विकट हास्य अथवा उपहास यांत होण्याचा संभव असतो. उलट, जीवनदर्शनानें ज्याचें हृदय कारुण्यपूर्ण झालें आहे अशा कवीच्या कृतींत हेंच हास्य केवळ विहास-परिहासांत परिणत न होतां तें सहानुभूति-पूर्ण मृदु हास्यांत परिणति पावतें. ओठावरील हास्याबरोबर पाण्यानें भारावलेल्या पापण्यांचेंहि दृश्य आपल्याला दिसूं लागतें. हंसूं थोडें आणि आंसू फार असाहि प्रकार होतो. कित्येकदां थेंबें थेंबें सांचलेलें हें अश्रूंचें तळें बांध फोडून आपल्या आवेगाबरोबर इतरांनाहि ओढून नेणार कीं काय असें वाटत असतांनाच कैलासम् यांची प्रतिभा विनोदाचा प्रस्फोट करीत हास्याकडे धांव घेते. कैलासम् यांच्या हास्याचा उद्देश दोषोद्घाटन हा नसून, हृदयद्रवीकरण हा आहे. लोकांचें दोष-दौर्बल्य पाहून त्यांच्या मनांत रोष पेटत नाहीं. उलट, या दोषामुळें जनजीवन किती बिघडून गेलें आहे हें पाहून त्यांना खेद उत्पन्न होतो. त्यांचें हास्य प्रेक्षकांना जखमी करण्याच्या खटपटींत गढलेलें नसतें. उलट, घायाळ झालेल्या कविहृदयाला मोकळी वाट करून देण्याकरितां त्या हास्याची धडपड चालूं असते.

श्रद्धा, दान, तप यांत जसे सात्त्विक, राजस, तामस असे भेद आहेत तसेंच शृंगार, वीर, करुण, हास्य यांतहि सात्त्विक, राजस, तामस भेद आहेत. शुद्ध आनंदाची आशा असणारा लेखक जीवनाकडे शुद्ध दृष्टीनें पाहतो. जेव्हां तो आपल्या शुद्ध भावनेला रूप देतो, तेव्हां रसस्यंदी असें श्रेष्ठ साहित्य निर्माण होतें. ज्या प्रमाणांत रस निर्मळ असतो त्या प्रमाणांत परिणामहि तीव्र होतो. परिणामकारी शृंगार, वीर, करुण, हास्य, आणि इतर रस ज्या क्षणीं अंतःकरणाचा ठाव घेतात त्या क्षणीं अहंकाराच्या पाशांतून आपली मुक्तता किंवा मुक्ति होते. आणि या मुक्तीचें स्वरूपहि त्या त्या जीवाच्या सहृदयतेनुसार असते. ज्याची अहंकाराची हृदयग्रंथी बळकट, त्याची मुक्तिहि तितकी सोपी नसते. पण तशा माणसाला-हि अशा रसाचा तीव्र स्पर्श दहांदा झाल्यास त्याच्या वरहि कांहीं परिणाम अवश्य होत असतोच कैलासम् यांचा हास्यरस निर्मलतेनें आणि तीव्रतेनें असाच वारंवार आघात करीत मनास मुक्ति देणारा आहे. कैलासम् यांच्या हास्यरसाविष्काराचा विचार करतां असें वाटतें कीं, साहित्यमंदिराच्या नवरंगां-तील हें एक हास्याचें दैवत त्यांच्या शुद्ध हृदयावर प्रसन्न होऊन त्यांच्याकडे वळलें आणि त्यांना प्रत्यक्ष झालें आणि त्याच्या आराधनेंत कैलासम् कृतकृत्य झाले.

## खरींखुरीं मानवी पात्रें

या रसाराधनेमुळें कैलासम् यांच्या कृतींतून जो विशाल अर्थविस्तार साधला आहे तो कदाचित् त्यांच्याहि अपेक्षेपलीकडे साधला असेल ! ' टोळ्ळु-गट्टि ' या नाटकांत त्यांच्याच उद्देशानुसार असणारी आपल्या सध्यांच्या शिक्षणावरील टीकाच केवळ आहे असें नाहीं. त्यांत निव्वळ बुद्धीची कसरत करून, आपल्या आवडीच्या तत्त्वप्रतिपादनाकरितां, आपलेच अभिप्राय प्रकट करणाऱ्या केवळ कळसूत्री बाहुल्या नाचवून त्यांनीं रंगभूमि सजविली नाहीं. आपल्या अभिप्रायाच्या समर्थनार्थ नाट्यवस्तु निवडतांना, त्यांनीं स्वतः जीवनांत जीं कांहीं खरींखुरीं मानवी पात्रें पाहिलीं, तीं त्यांनी पुढें आणलीं. जर तीं पात्रें केवळ बाहुल्याच असत्या तर त्यांची उसनी भाषा बोलून हीं पात्रें गप्प बसलीं असतीं. पण तीं मानवी पात्रें असल्यामुळें तीं मानवी भाषा बोलतात, आणि त्यांची वागणूक








ही मानवसुलभ मोकळेपणाची असते. या पात्रांचा निर्माता जरी त्यांना आपल्या तत्त्वप्रतिपादनाकरितां पुढें आणतो, तरी तीं पात्रें मात्र पुढें आल्यावर आपलीच भाषा बोलतात आणि आपल्याच तंत्रानें वागतात. त्यामुळें त्यांतून बहुमुख असा ध्वनि ओथंबून बाहेर पडतो. ' टोळ्ळु गट्टी ' तील कैलासम् यांचा हिरियण्णय्य, त्याची बायको, मुलें, सुना, नागूआत्या हीं पात्रें विद्याभ्यासाशिवाय, पढीकपणाशिवाय अनेक गोष्टी बोलतात आणि अनेक गोष्टी सुचवतात. त्याचप्रमाणें ' वारुळांत वारूळ ' या नाटकांतील हिरियण्णय्य, त्याची आई, त्याचा मुलगा कप्पण्णा, त्याची सहचारिणी बोरा या सर्वांच्या बोलण्याचालण्यावरून केवळ एका विशिष्ट ठश्याच्याच नीतीचा बोध होतो असें नाहीं. आणि बहुतकरून ग्रंथकाराचा उद्देश तसा नसेलहि ! त्यानंतर वीस वर्षें कैलासम् यांनीं वाङ्मय निर्माण करून आपल्या सिद्धीचा मार्ग पुष्कळ चोखाळला. पण ' वारुळांत वारूळ ' निर्माण करणाऱ्या कारागिराचे कौशल्य काय वर्णावें ? तें कौशल्य प्राप्त करून घेतांना त्यांनीं केलेली तपस्या थोडी-थोडकी नव्हती ! ती दृष्टि, तो भाव ! तें कल्पना-सामर्थ्य, ती चलाखी ! कानडी साहित्यांत कैलासम् यांच्या या कृतीनें अगदीं कळस गांठला आहे. या प्रकारची त्यांची रचना जागतिक साहित्यांतील त्या प्रकारच्या कोणत्याहि साहित्याहून कमी दर्जाची नाहीं असा साधार अभिमान कानडीस त्यामुळें प्राप्त झाला आहे.

### ' सामुद्रो हि तरंगः ' !

" व्यक्तीचें वर्णन पुरें, तिच्या कृतीची गोष्ट बोल '—असें कैलासम् आपल्या सहकाऱ्यांना सदां सांगत असत. या लेखांत मी तर कैलासम् यांच्या कृतीविषयीं बोलण्याऐवजीं त्या व्यक्तीविषयीं-च जास्त लिहिलें आहे. कैलासम् यांना वाटत असेल की आपल्याहून आपली कृति श्रेष्ठ म्हणून. त्यांचेंहि बरोबर आहे. पण त्यांच्या कृतीहून तेच श्रेष्ठ आहेत असें आम्हाला वाटणेंहि तितकेंच सहज आहे. " सामुद्रो हि तरंगः क्वचन समुद्रो न तारंगः '! कैलासम् केवळ साहित्य निर्माण करण्यां-तच गढून गेले असते, इंग्लंडमध्यें बर्नार्ड शॉ यांना जी अनुकूलता मिळाली ती कैलासम् यांनाहि मिळाली असती, त्यांचे ग्रंथ पुष्कळ प्रकट होऊन, रंगभूमीवर तीं नाटकें आलीं असतीं तर ती गोष्ट निराळी ! मग आम्ही म्हटलें असते कीं 'व्यक्ति राहू द्या बाजूला ! ' पण त्या भाग्याचा वांटा कानडीला लाभला नाहीं. कैलासम् यांच्या प्रतिभेची साक्ष देण्या-पुरते केवळ कांहींच ग्रंथ आजपर्यंत प्रसिद्ध झाले. लेखक मात्र अनिकेत पक्ष्याप्रमाणें कोणाच्याहि हातीं न गवसतां दूर दूर फिरत राहिले. अगदीं स्नेही स्नेही म्हणणाऱ्या मंडळींनाहि त्यांचें स्मरण करीत आनंद मानण्यापलीकडे कांहीं करितां आलें नाहीं. असें असल्यामुळें, त्यांच्या ग्रंथापेक्षां त्यांच्याविषयींच मी जर जास्त लिहिलें असेल तर तें गैर गणलें जाऊं नये. यदाकदाचित् यांत कांहीं चुकलें असल्यास ही एका मित्राची चूक आहे अशा सहानुभूतीनें कैलासम् यांनीं क्षमा केली असती, असा माझा विश्वास आहे.

सुमारें दहा वर्षांपूर्वीं कैलासम् यांच्या कांहीं लहानमोठ्या मित्रांनीं ' कैलासम् काव्योत्सव ' या नांवानें एक उत्सव साजरा केला होता. एक सबंध आठवडाभर त्यांच्याविषयीं व्याख्यानें व त्यांच्या ग्रंथांचें वाचन चालू ठेवलें. एखादा प्रतिभावान् लेखक आपल्या ग्रंथनिर्मितीनें उत्सवाचें वातावरण कसें निर्माण करूं शकतो हें पाहणें असल्यास अशा उत्सवांत एखादा दिवस तरी अवश्य भाग घ्यावा. " एकच लेखक इतकें लिहितो का ? किती तरी प्रकार ! किती रुचकर ! " असे उद्गार, तीं व्याख्यानें व तें वाचन ऐकून प्रेक्षकांनीं आश्चर्यानें काढले. त्या वेळीं कैलासम् यांनीं मध्य-वय ओलांडलें होतें. अनुभवाच्या दृष्टीनें ते कधींच ज्ञानवृद्ध झाले होते. पण त्यांचें मन इतकें खंबीर कीं ते तेव्हांहि तरुणच होते. त्यांचें व आमचें पुण्य फळाला आलें असतें तर आणखी ४–६ ग्रंथ त्यांनीं रचले असते. पण तसें कांहीं घडलें नाहीं. कैलासम् निवर्तले. आज त्यांची स्मृति, त्यांची कीर्ति काय ती शिल्लक आहे. त्यांच्या साहित्यगुणाचा ज्या मित्रांना अनुभव आला, त्यांनीं त्यांचें कार्य पुढें चालविलें पाहिजे; त्यामुळेंच कैलासम् यांचें साहित्य सर्व कानडी लोकांच्या हातचा आरसा होईल.








सुप्रसिद्ध कन्नड साहित्यिक
टी. पी. कैलासम् यांच्या
‘ The Purpose ’
( a playlet of Ekalavya )
या इंग्रजी नाट्यकृतीवरून अनुवादित.

# प्र यो ज न

के. नारायण काळे
बी. ए. ( ऑ. ), एलएल्. बी.

अनुक्रमणिका








**टी. पी. कैलासम्** यांच्या सुपुत्री
सौ. **लक्ष्मी गणनाथन्**, बी. ए. यांनी
'Purpose' चा अनुवाद करण्यास
व तो प्रसिद्ध करण्यास
परवानगी दिली याबद्दल
मनःपूर्वक आभार.

'नवभारत' मा
सेप्टेंबर १९५








# प्र यो ज न

## अंक पहिला

[ स्थळ : हस्तिनापुरांतील कौरव-कुमारांचें क्रीडांगण.

दृश्य : पाठीमागील बाजूस गदा आणि खड्गयुद्धाचा अभ्यास करीत असलेले कांहीं धिप्पाड कुमार; मध्यभागीं शरसंधानाचा सराव करीत असलेला अर्जुन. त्याचें 'लक्ष्य' एका झाडाच्या फांदीस टांगलेलें आहे. पुढील बाजूस नकुल-सहदेव व गुरु द्रोणाचार्य. नकुलाच्या हातांत अश्वारोहणकार्यांत उपयुक्त असलेला प्रतोद. सहदेव स्वतःपेक्षांहि उंच असलेलें एक धनुष्य सज्ज करण्याच्या खटपटींत आहे. ]

**सहदेव** : ( त्रासिक मुद्रेनें ) गुरुजी, नाहीं पेलत हें धनुष्य मला ! किती अवजड ! उचलत-देखील नाहीं मला तें !

**द्रोण** : ( आश्चर्याच्या आविर्भावानें ) अवजड ? अं ! वत्सा, तूं क्षत्रिय आहेस, हें विसरलास वाटतें. क्षत्रियाला अवजड वाटावें, असें धनुष्य जगांत मुळीं असूंच शकत नाहीं. नुसतें उचलायलाच नव्हे, तर नमवायला, प्रत्यंचा चढवायला आणि बाण सोडायलासुद्धां !

**सह०** : ( अधिक त्रासिकपणानें ) मी क्षत्रिय आहें, हें नाहीं विसरलों मी, गुरुजी. पण ( धनुष्य वांकवीत )...पण हें फारच मोठें आहे. उचलत सुद्धां नाहीं मला तें.

**द्रोण** : असें ! म्हणजे तुझें म्हणणें असें कीं, तें पेलण्याइतका तूं मोठा नाहींस—

**सह०** : ( गोंधळून ) हो ! तेंच म्हणतोंय् मीहि गुरुजी.

**द्रोण** : तेंच म्हणतो आहेस ! नाहीं, मुळींच नाहीं. धनुष्य मोठें असलें, तर तें आहे त्याहून लहान करतां येणें, कोणालाहि शक्य नाहीं. पण तें धनुष्य उचलायला आणि नमवायला हवी तेवढी शक्ति तुझ्या अंगांत नसली—तेवढा मोठा तूं नसलास—तर तेवढी शक्ति तुला कमावतां येईल—तेवढा मोठा तुला होतां येईल...खरें ना ?

**सह०** : ( चांचरत )...मला वाटतें...येईल..

**द्रोण** : वाटतें ? वाटतें काय म्हणून ! अवश्य येईल—आलेंच पाहिजे. तो पाहा तिकडे—तुझा थोरला भाऊ. आपली गदा फार अवजड आहे, आपल्याला ती पेलवत नाहीं, म्हणून कुरकुरत होता तो. पण आतां काय अनुभवाला येतेंय् त्याच्या ? -कीं ती पेलण्याइतका तो स्वतः तेव्हां बळकट नव्हता. पाहा-तेव्हां होती तितकीच आजहि ती गदा जड आहे. पण आतां एकाद्या हलक्या फुला-सारखी ती फिरवतोय् तो. अन्-तुला माहीत आहे, गेले अकरा दिवस भीमसेन कुठें होता तें ?

**सह०** : आहे.

**द्रोण** : कुठें ?

**सह०** : व्यायामशाळेंत.

**द्रोण** : आणि येते अकरा दिवस तुलाहि तेथेंच राहावें लागेल. ( थोडा वेळ नकुलाकडे पाहात राहातो नंतर दृष्टि वळवून )...आणि तूंसुद्धां तेंच करायला पाहिजेस, नकुला !

**नकुल** : ( चपापून ) मी...मी...गुरुजी ? ...कां ?

**द्रोण** : ( त्याच्याकडे न पाहतांच ) तुला वाटलें असेल कीं, आज पहांटे तुझे अश्वारोहणाचे प्रयोग चालले होते तेव्हां माझी तुझ्यावर नजर नव्हती. पण तसें नाहीं. मी पाहात होतों सगळें. घोड्याची आयाळ-नकुला, ( नकुल लाजून जीभ चावतो )








स्वारानें पकडण्यासाठीं केलेली नाहीं. हां–आतां जर का ( नकुलाच्या दृष्टीला दृष्टि भिडवून ) तो भ्यालेला असेल — भेदरलेला असेल —

**नकुल :** ( स्वतःवर नसता आरोप होतो आहे अशा आविर्भावानें ) भेदरलेला ? छे छे ! मी मुळींच भेदरलों नव्हतों, गुरुजी. माझ्या हातून...अं...जें कांहीं घडलें...तें...तें...ते भीतीमुळें नाहीं घडलें.

**द्रोण :** अस्सें ? मग तुझ्या हातून जें कांहीं घडलें तें कशामुळें घडलें तर ?

**नकुल :** मीं आयाळ पकडली–कारण त्या प्रचंड अश्वावरुन घसरुन पडायचें नव्हतें मला. खरेंच, केवढा मोठा, प्रचंड घोडा होता तो, गुरुजी !

**द्रोण :** ( तिरस्कार आणि राग यांचा आव आणून ) केवढा मोठा, प्रचंड घोडा होता –अं: ! आणि स्वतःला क्षत्रिय म्हणवतोस ! आतांच तुझ्या धाकट्या भावाला मीं जें सांगितलें त्याचा अर्थ —

**नकुल :** ( मध्येंच ) आला माझ्या ध्यानांत, गुरुजी —

**द्रोण :** हं ? काय होता माझा अर्थ ?

**नकुल :** तुम्हांला म्हणायचें होतें, गुरुजी, कीं मी क्षत्रिय आहें, याचा मला कधींच विसर पडतां कामा नये. आणि जगांतलें कोणतेंहि धनुष्य—नव्हे, कोणताहि अश्व खऱ्या क्षत्रियाला उचलतां न येण्याइका .. अं ? नव्हे—आयाळ पकडल्याशिवाय त्याच्यावर बसतां न येण्याइतका... मोठा असूंच शकत नाहीं ! तो घोडा प्रचंड होता असें नव्हे; कारण, तसें असलें तर त्याला लहान करतां येणें कुणालाच शक्य नाहीं...तर खरें म्हणजे मीच पुरेसा मोठा नाहीं–बळकट नाहीं–आणि म्हणूनच मलासुद्धां एक मंडलपर्यंत व्यायामशाळेंत राहायला हवें. आणि मग तेथून परत आलें कीं,—

**द्रोण :** [ हंसूं दाबीत ] होय ! आज चतुर्थी आहे. आजपासून, प्रतिरात्रीं चन्द्रमा जसा अधिकाधिक मोठमोठा आणि तेजस्वी होत जातांना दिसेल, तसतसे आपले देह आणि अवयव अधिकाधिक बळकट आणि पुष्ट होत जातील, इकडे तुम्हीं अवधान दिलें पाहिजे. आणि पूर्णिमेच्या दिवशीं तुमचे पितामह, भगवान् भीष्म, आपल्याला भेट द्यायला येतील, तेव्हां तूं–नकुला, तूं–त्यांच्या त्या प्रचंड–अतिप्रचंड-पण त्या वेळीं तुला आपल्या आवांक्याबाहेर वाटण्याइतका प्रचंड न राहिलेल्या 'दीर्घकेश' अश्वावर–त्याची आयाळ न पकडतां–स्वार झालेला दिसशील–आणि तूं [ सहदेवाला ] माझ्या बालवीरा, तूं हें धनुष्य उचलूं शकशील–इतकेंच नव्हे, तर त्याला प्रत्यंचा चढवून त्यानें शरसंधान सुद्धां करशील—

**सह० :** [ टाळ्या वाजवीत ] खरेंच, गुरुजी ? खरेंच करीन मी ?

**द्रोण :** अर्थात् करशील. हं, वत्सांनो, आतां चला–पळा ! अन् आपापल्या साधना तीव्रतीव्र सुरु करा.

[ दोघे उजव्या बाजूनें जावयास निघतात ]

**नकुल :** [ द्रोणांना ऐकूं न येईल इतकें दूर गेल्यावर, मान वळवून खांद्यावरुन त्यांच्याकडे पाहात चिडक्या स्वरांत-अर्धवट स्वतःशींच ] मी भेदरलेला ? मी भ्यालों काय ! कळेल. पूर्णिमेच्या दिवशीं कळेल, मी कसा आहें तो ! त्या दिवशीं ताताजींच्या घोड्यावरुन दौड करतांना गुरुजींनाच आश्चर्यानें डोळे फाडून पाहायला लावलें नाहीं—

**सह० :** काय ? म्हणजे तूं त्या दिवशीं तसाच ( हलक्या आवाजांत ) म्हणजे आयाळ न पकडतांच—

**नकुल :** ( चिडून ) आयाळ ? मूर्खा ! लगाम-सुद्धां न पकडतां !...भेदरलेला...मी ! मी भेदरतों, होय ?

[ डाव्या बाजूनें भीष्म प्रवेश करतात ]

**भीष्म :** ( हात जोडून ) आचार्य, नमस्कार.

**द्रोण :** ( किंचित् मस्तक नमवून ) ईश्वर आपलें कल्याण करो, गांगेय. या वेळीं आपण बाहेर ? इतक्या लवकर आज आपण सभा सोडून बाहेर कसे ?

**भीष्म :** मला आंत राहावेंसें वाटावें असें होतें काय केव्हां सभेंत ? ( क्रीडांगणाच्या मध्यें आणि मागील बाजूस नजर टाकून ) कसे काय आहेत आपले विद्यार्थी ? ठीक चाललें आहे ना त्यांचें शिक्षण ?

**द्रोण :** हं ! ठीक चाललें आहे, थोडीथोडी, हळूहळू–पण प्रगति आहे.








भीष्म : ( उतावळेपणाच्या आवेशानें एकदम ) थोडथोडी ? हळूहळू ? नाहीं-अशी दिरंगाई नाहीं कामाची, आचार्य ! क्षमा करा मला. पण ज्या प्रयोजनानें, उद्देशानें, त्यांची ही सारी तयारी चालली आहे—त्याच्या स्वरूपाची माझी कल्पना अजूनहि धूसरच आहे—त्याच्या परिपूर्ततेसाठीं ते जितक्या लवकर समर्थ होतील, तितक्या लवकर आपली दोघांचीहि या खटाटोपांतून सुटका होणार आहे, आपल्याला विश्रांति मिळणार आहे. निदान मी तरी या विश्रांतीला अगदीं आसावलों आहें. मी आतां थकलों, आचार्य !...शरीरानें, मनानें, आत्म्यानें, अगदीं थकून गेलों. मला विश्रांति हवी. अखेरची - चिरविश्रांति-हवी !

द्रोण : ( कपाळाला आंठी घालून ) या साऱ्या अध्यापनाचा उद्देश आपणाला धूसर ?

भीष्म : होय ! धूसरच नाहीं तर काय ? त्या उद्देशाचा साक्षात्कार म्हणजे ( वर आकाशाकडे पाहून ) '**त्या**'चा साक्षात्कार ! कारण '**तो**'च केवळ '**तो**'च या साऱ्या व्यापाचा आदि-हेतु जाणतो ! आपण नव्हे. त्याचा उपयोग काय तेवढेंच आपल्याला माहीत. या सर्वांचा अंतिम उद्देश, परमप्रयोजन काय, याचा आपण केवळ तर्क करणार—

द्रोण : 'उपयोग' ? 'उद्देश' ? 'प्रयोजन' ? 'तर्क' ?—मला कांहींच बोध होत नाहीं.

भीष्म : बोध होत नाहीं ? ( क्रीडांगणाच्या पुढील आणि मध्यभागाकडे हस्तक्षेप करून ) तर मग पाहा ! कृपा करून नीट अवलोकन करा, आचार्य ! आपल्या हाताखालीं आणखी कांहीं वर्षें जाऊं द्या कीं, सुयोधन आणि भीमसेन यांचे ते कोवळे लुसलुशीत खांदे, कालांतरानें स्नायूंचे प्रचंड गड्डे बनून सहस्रावधि मस्तकांचा चेंदामेंदा करण्यासाठीं सारखे शिवशिवायला लागलेले असतील. आपल्या हाताखालीं फक्त आणखीं थोडीं वर्षें, आचार्य- ! आणि आज वेलीप्रमाणें नाजूक असलेले अर्जुनाचे बाहू, हजारों माणसांच्या रक्तानें आपल्या लक्षावधि बाणांची पिपासा शमविण्यासाठीं सदैव तहानेल्या अशा पोलादी कांबी बनतील ! अशा रीतीनें आपलें शिक्षण आणि दिग्दर्शन यांचा परिणाम या कोंवळ्या पोरांपैकीं प्रत्येकजण कालान्तरानें महाभयंकर अशा विनाशक शक्तींत परिणत होण्यांत होणार आहे. हा आणि केवळ हाच, या साऱ्या अध्यापनाचा उपयोग. त्याचा उद्देश, त्या साऱ्याचें अंतिम प्रयोजन, काय असेल तें आपण केवळ अनुमानानें अजमावायचें आणि तसें तें आजमावतांना, आपलें अनुमान अचूक तर ठरणार नाहीं ना, असें भय मनांत बाळगायचें !

द्रोण : भय ? अचूक अनुमान करण्याचें भय ? आपलें अनुमान असें काय भविष्य सांगतें ?

भीष्म : विनाश ! आचार्य, त्याचें भविष्य विनाश ! अखिल कुरुकुलाचा, त्याच्या स्वतःच्या हातानें विध्वंस ! आपण आश्चर्यचकित झालांत, आचार्य ?–तर मग ऐका. सावधान चित्तानें ऐका. 'ज्ञातिश्चेदनलेन किम्' हें सुभाषित पृथ्वीतलावरील प्रत्येक कुलाच्या विधिलिखिताची खरीखुरी भविष्यवाणी आहे...होय, माझ्या कुलाचीसुद्धां ! या बिचाऱ्या पोरांच्या नशिबीं आलेला हा भाऊबंदकीचा जन्मसिद्ध शाप;–त्यांचे पिते आणि पूर्वज या घातुक कलहांत दर्शवीत असलेला पक्षपात; त्यांचीं रक्ताचीं बंधनें बळकट करण्याऐवजीं, तीं जास्तच शिथिल करण्याची, त्यांच्यामधील असूयेचे अंगार विझविण्याऐवजीं ते अधिकच चेतवण्याची, खुद्द सभेकडून घडणारी कामगिरी; आणि त्या सर्वांच्या भरीला–त्यांच्या द्वेषभावना त्यांना परिणामकारक रीतीनें प्रकट करावयाला समर्थ करणारें, आपणांकडून त्यांना मिळणारें अस्त्रविद्येचें शिक्षण; इतक्या गोष्टी स्पष्ट दिसत असतांना, अखिल कुरुकुलाचा त्याच्याच या कोंवळ्या कोंबांकडून पुरता निःपात होणार–यापेक्षां दुसरें कोणतें भविष्य माझें अनुमान मला सांगणार, आचार्य ? या भयानक पर्यवसानाचा अहोरात्र विचार करीत असतांना, मी स्वतःला एवढेंच कळावें म्हणून प्रार्थना करीत असतों कीं, स्वकुलाचें संरक्षण हेंच ज्याच्या दीर्घ जीवनाचें एकमेव कार्य, कुलाचें सातत्य टिकवण्याचा प्रयत्न हीच ज्याची हें कंटाळवाणें जीवन कंठण्याची एकुलती एक सबब, तो मी स्वतःच, या माझ्या कुलावर ओढवणाऱ्या संकुल संहाराच्या आपत्तीला










किंतीसा कारणीभूत होतों आहें ! ( मस्तक खालीं करून आपला संत्रस्त चेहरा हातानें झांकून घेतो. )

**द्रोण :** ( सांत्वनाच्या स्वरांत ) पण गांगेय, हें केवळ आपलें अनुमान आहे. ही आपत्ति—आपण म्हणतां तें हें संकट—म्हणजे कांहीं निश्चित भवितव्य नव्हे !

**भीष्म :** नव्हे, आचार्य ! तें खरोखरच निश्चित भवितव्य नव्हे...आणि तरी पण त्याची अनिश्चितता-च माणसाला असहाय, निष्क्रिय करणारी आहे. निश्चिततेच्या माध्याह्नांत माणूस केवढ्याहि भीषण संकटाला शांत चित्तानें तोंड देऊं शकतो. कारण संकट दिसलें, समजलें, उमजलें कीं, त्याची भयावहता उरतच नाहीं. संकटाशीं प्राणपणानें झुंजतांना, माणसाला त्याच्याबद्दल वाटणारें भय आपोआपच मरून जातें, झगड्याच्या आगींत जळून खाक होतें. त्याचप्रमाणें, अज्ञानाच्या अंधकारांत संकट दिसलें नाहीं, तरीहि माणूस अंधविश्वास आणि भाबडी आशा यांच्या जोरावर धीरानें पुढें उडी घेऊं शकतो; पण माणसाचें रक्त गोठवणारी-त्याचीं गात्रें बधिर करणारी—त्याची युयुत्सा ठार मारणारी कोणती गोष्ट असेल तर ती अनिश्चिततेच्या संधिप्रकाशांतील त्याची असहाय, हताश धडपड ! या अवस्थेंत संकट आपलें वास्तवरूप स्पष्टपणें प्रकट करीत नाहीं, पूर्णपणें स्वतःला नजरेआडहि दडवीत नाहीं; आणि पाहाणाऱ्याच्यां अंतःकरणांतील भीति त्याला जें रूप आणि जो आकार देईल, तो घ्यायचें नाकारीतहि नाहीं. आचार्य, मी मघाशीं म्हणालों ती धूसरता हीच. त्या धूसरतेंत या साऱ्या अध्यापनाचा उद्देश, त्याचें प्रयोजन लपलेलें आहे. त्याचा उपयोगच तेवढा आपल्याला समजतो. ( तात्पर्य काढल्याप्रमाणें ) एकाद्या नाटकांतील पात्रांप्रमाणें, आचार्य, आपण एका एका प्रवेशांतला आपापला अभिनय करतों आहों. त्यांतील ओळन् ओळ आपल्याला तोंडपाठ आहे. पण त्या समग्र नाटकाचा भावार्थ काय, हें मात्र आपल्याला कळलेलें नाहीं. आपण मार्गावरून चाललों आहों. त्यावर पडणारें प्रत्येक पाऊल आपल्याला कळतें आहे पण त्या प्रवासाचें प्रयोजन काय, हें मात्र उमजत नाहीं.

**द्रोण :** आणि तरीहि, गांगेय, मीं आपणांला स्मरण द्यायला पाहिजे, असें नाहीं—सर्वांआधीं ( दृष्टि वर वळवून ) '**त्या**'ला या साऱ्याचें प्रयोजन ठाऊक आहे. तुम्हां-आम्हांला नव्हे. आपण फार फार तर प्रयत्न करणार; आणखी काय ? बाकी सर्व '**त्या**'च्याच स्वाधीन !

**भीष्म :** ( आवेशयुक्त स्वरानें ) मी तें विसरलों नाहीं, आचार्य ! पण माझी अशी भावना होती कीं, माझ्या जीवनांतील साऱ्या परिश्रमांचा हेतु सफल किंवा विफल होणें,—त्या परिश्रमांना गोड किंवा कडू फळें येणें यांत, आणि माझ्या परिश्रमांतील '**त्या**'च्या उद्देशांत कांहीं तरी साहचर्य असेल. त्या दोहोंपैकीं एकाबद्दलची तगमग आणि दुसऱ्या-बद्दलची भीति यांची गळचेपी करून, आपलें हृदय आणि मन केवळ आपल्या परिश्रमांनाच वाहणें, मला कठिण आहे—अतिशय कठिण आहे, आचार्य ! परिश्रमांपुरतेंच बोलायचें, तर परि-श्रमांना मी परका नाहीं. अत्यंत कठोर परिश्रम-सुद्धां मला परके नाहींत. तुम्हांला माझें आयुष्य माहीत नाहीं, आचार्य ! तुम्ही तरुण आहां, पण बहुधा तुम्हीं त्याबद्दल ऐकलें असेल. परिश्रमां-व्यतिरिक्त दुसरें माझ्या आयुष्यांत कांहींच नाहीं. परिश्रम—परिश्रम—परिश्रम—सर्व जीवनभर केवळ श्रम ! ! ज्यांत माझा कांहींच वैयक्तिक फायदा नाहीं, ज्यांत मला कांहींच आनंद नाहीं असे श्रम ! आणि हे श्रम निदान माझ्या कुलाला तरी उपयुक्त ठरत आहेत, अशी आतांपर्यंत मला भूल होती;—आतां तीहि भंग पावली. हातीं घेतलेल्या कार्यांतील क्लेश मला त्यापासून कधींच परतवूं शकले नाहींत. कंटाळवाणेंपणामुळें त्याबद्दलचा माझा उत्साह कधींहि मालवला नाहीं; आणि आतां सुद्धां, माझ्या बांधवांच्या संहाराची जी ही आपत्ति कुरुकुलावर ओढवणार आहे, ती टाळण्याच्या प्रयत्नांतील माझी असहायता, मला माझ्या परिश्रमांपासून परावृत्त करणार नाहीं. एवढें लांबलचक कंटाळवाणें आयुष्य नशिबीं आलें, तींत केवळ आपलें घर पक्क्या पायावर कसें उभा-रतां येईल याबद्दलच्या प्रयत्नांशिवाय दुसऱ्या कशाचाच ध्यास मीं धरला नाहीं. आणि आतां असें



अनुक्रमणिका

आढळून येतें आहे कीं, तो पाया मजबूत करण्यासाठीं म्हणून जी जी नवी वीट रचली, तिचा उपयोग फक्त आधीं रचलेल्या अनेक विटा ढांसळायलाच काय तो झाला ! आणि असें असतांहि आपलें तें कार्य तसेंच पुढें चालू ठेवायचें, आणि स्वत:चें तें घर कोसळतांना, जमीनदोस्त होतांना, उघड्या डोळ्यांनीं पाहायचें ! कठिण–आचार्य, अतिशय कठिण आहे हें !

—स्वत:चे श्रमच त्याच्या फळांना कडूपणा आणायला कारणीभूत होत आहेत, हें उमजत असतांहि, ते श्रम तसेच पुढें चालू ठेवायचे, यापेक्षां अधिक कठिण कांहीं नाहीं. आणि तरीहि कां कोणास ठाऊक, मला वाटतें कीं, हें सारें कितीहि कठिण असलें तरी, परिणामाबाबत अंत:करण आंधळें करून, मला श्रम-श्रम–श्रमच करीत राहिलें पाहिजे. मला विसर पडला नव्हता.–पण आपण मला आठवण करून दिली, फार चांगलें केलें कीं, आपणां सर्वांआधीं या सर्वांच्या प्रयोजनाची जाणीव '**त्या**'ला आहे. आपल्याला नव्हे !

—आणि आतां, मला ज्याचा विसर पडला होता, तें हें मला नीट ध्यानांत ठेवलें पाहिजे कीं, कडू असो वा गोड असो, माझ्या सर्व श्रमांचें फळ अखेरीस '**त्या**'चें आहे; माझें नव्हे. आणि जें कांहीं घडलें, जें कांहीं अखेरपर्यंत घडेल त्यांतील केवळ श्रमच तेवढे माझे आहेत. अधिक कांहीं नाहीं. आचार्य ! मीं आपल्या श्रमफलांवर गृहीत धरलेली माझी सत्ता, माझ्या कष्टानें पिकलेल्या पिकावर मीं कल्पिलेला स्वत:चा अधिकार, यांनींच माझ्या हृदयांत सुख आणि दु:ख, आशा आणि भीति, अहंकार आणि निराशा यांना वसति करायला अवसर मिळाला. पण आतां त्या भावनाहि आपोआप लयाला गेल्या. आतां मला कळून चुकलें कीं, त्या पिकाची कापणी करण्याचा अधिकार '**त्या**'चा.फक्त '**त्या**'चाच. मी केवळ नांगरणी आणि पेरणी करणारा; अधिक कांहीं नाहीं. पण या सर्वांचा शेवट कांहींहि होणार असला, तरी आचार्य, तो आतां लवकर होऊं द्या. या कार्यांतील आपला भाग लवकर आटोपून घ्या. मी आतां थकलों. अखेरची दीर्घ विश्रांति मला हवी. आपल्या शिष्यांच्या प्रगतींतील संथपणावर मी कां चिडलों, याची आतां आपल्याला कल्पना आली असेल. ( त्यांची दृष्टि इतस्तत: भ्रमण करीत असतांना अर्जुनावर पडते. कांहींशा चिडक्या स्वरांत ) तो पाहा, तो कुमार अर्जुन. त्यानें आपलें शरीर लांकडासारखें ताठ आणि अचल ठेवलें आहे. तो असाच बाण मारीत राहिला, तर त्याला थकून जायला कितीसा वेळ लागणार ? ( एकदम आपल्या भाषणाचा ओघ थांबवून, द्रोणांकडे स्मितपूर्वक पाहात ) क्षमा करा, आचार्य ! आपला लाडका शिष्य म्हणून माझा नातू सुयोधन नेहमीं ज्याचा उल्लेख करीत असतो, त्या आपल्या पट्टशिष्याच्या कर्तबगारीचा मीं असा अधिक्षेप केला, याबद्दल मला क्षमा करा.

**द्रोण** : ( मनाची चलबिचल दिसूं न देण्यासाठीं स्मित करीत ) माझा लाडका शिष्य ? पण मला कुणीच लाडका नाहीं. कुणालाहि कमी-अधिक वाटावें अशी वागणूक मीं केव्हांच—पण-पण गांगेय, आपण जाणतांच—

**भीष्म** : होय. मी जाणतों, आचार्य ! आणि म्हणूनच आपल्या कामांतील कठिणपणा आपल्या ध्यानीं आणून द्यावा या हेतूनें मीं तो उल्लेख केला. [ हंसतो, द्रोणहि हंसतो ].

**द्रोण** : बरोबर आहे, गांगेय. आपण योग्य तेंच केलें.

**भीष्म** : मोठें आश्चर्य वाटतें मला ! आज सकाळच्या प्रहरींच मला असें कां व्हावें ? माझा राग माझ्या ताब्यांत राहिला नाहींसें दिसतें.

**द्रोण** : ( हंसून, आश्चर्याच्या आविर्भावानें ) आपला राग आपल्या ताब्यांत राहिला नाहीं ? हं: ! ताब्यांत राहायला आपल्याला आधीं राग येऊं शकतो, हीच कल्पना नव्हती मला.

**भीष्म** : मलाहि नव्हती, आचार्य. पण आज तो अगदीं अचानक आला–आणि हां हां म्हणतां माझ्या आटोक्यांतूनहि गेला ! मला वाटतें, माझ्या मन:संतापाला आज सकाळची सभाच कारणीभूत झाली असावी—

**द्रोण** : कां ? असें काय घडलें सकाळच्या सभेंत ?








**भीष्म :** आणि दररोज सकाळीं तरी काय घडतें ? बडबड ! बडबड !! अखंड, अर्थशून्य बडबडीशिवाय दुसरें कांहीं नाहीं आणि तीसुद्धां सारा वेळ एकाच तोंडानें चाललेली. आचार्य, एखादा आंधळा माणूस जेव्हां आपली दृष्टीची उणीव भरुन काढण्यासाठीं अखंड बडबड करूं लागतो, आणि श्रोत्यांना बहिरें व्हावेंसें वाटतें तेव्हां त्यांनीं मुकें व्हावें असा आग्रह धरतो, तेव्हां माझ्या-सारख्या चिरवृद्धालाहि कधीं नव्हे तो राग येतो आणि त्यावर ताबा बसण्यापूर्वींच तो आटोक्यांतून-हि जातो !

**द्रोण :** होय, गांगेय ! आजची सभा ही अशी आहे !

**भीष्म :** होय आचार्य. आजची सभा ही अशी आहे. (मागें सरुन, हात जोडून, नमस्कार करुन) नमस्कार, आचार्य ! आतां आपल्या अनुज्ञेनें जरा आपल्या मुलांचा समाचार घेतों.

**द्रोण :** अवश्य, गांगेय-केव्हांहि.

(**भीष्म** क्रीडांगणाच्या मध्यभागीं अर्जुना-जवळ येतात. अर्जुन वळून भीष्माजवळ येऊन साष्टांग नमस्कार घालतो.)

**अर्जुन :** नमस्कार, ताताजी.

**भीष्म :** (अर्जुनाला उठवून त्याला आपल्या बाहूंत घेतो. त्याच्या कपाळाचें चुंबन घेतो आणि त्याच्या खांद्यावर हात ठेवून त्यास दूर धरतो. नजरेला नजर देऊन हंसत, प्रेमानें) माझ्या उदयो-न्मुख धनुर्धराला माझा आशीर्वाद असो ! पण पार्था, धनुर्विद्येंत तुला याहून अधिक प्रवीण व्हायचें असेल, तर आपलें शरीर कसें तोलून धरायचें याचा तुला जास्त अभ्यास केला पाहिजे. किती वेळ चालली आहे तुझी ही साधना ? सबंध सकाळभर ?

**अर्जुन :** नाहीं, नुकतीच-थोड्या घटिकांपूर्वीं-सुरुवात केली.

**भीष्म :** काय ! नुकतीच साधनेला सुरुवात केलीस ? आणि इतक्यांतच श्वास अपुरा पडून धापा टाकायला सुरुवात ! छे छे ! हें कामाचें नाहीं, पार्था !

**अर्जुन :** ताताजी, कदाचित् पुष्कळ वेळपर्यंत न थकतां सराव करीत राहण्याइतकी शक्ति नसेल आली अजून माझ्या अंगांत...पण दिवसेंदिवस अधिकाधिक सुधारणा होईल, अशी खात्री आहे माझी.

**भीष्म :** नाहीं. शक्य नाहीं. निदान आपल्या कामाचा सारा भार, केवळ आपल्या बाहूंवरच पडूं देशील, तोंपर्यंत तरी खास नाहीं ! तुला इतक्या लवकर थकवा येतो तो त्यामुळेंच.

**अर्जुन :** पण ताताजी, धनुर्विद्येंत बाहूच तर सारें काम करीत असतात, नाहीं का ?

**भीष्म :** होय, वत्सा ! बाहू काम करीत असतात खरे-पण ते एकटे, निःसहाय नव्हेत. बाहूंवर पडणारा कामाचा ताण कमी करण्यासाठीं तुला आपल्या शरीराच्या वजनाचा योग्य उपयोग करायला हवा.

**अर्जुन :** (अर्धवट स्वतःशीं) शरीराच्या वजनाचा उपयोग ? तो कसा करायचा ? (अचानकपणें कांहीं तरी आठवल्याची चमक त्याच्या नजरेंत तरळते.) हो ! आठवलें ! गुरुजीसुद्धां असें कांहीं तरी म्हणत होते खरे; पण ते काय म्हणाले, तें कळलेंच नाहीं मला.

**भीष्म :** गुरुजींनीं सांगितलेलें तुला समजलें नाहीं ? बहुधा त्यांचें बोलणें पुरेशा सावधान चित्तानें ऐकलें नसशील तूं. पुन्हां विचार त्यांना. विसरूं नकोस. कारण माझ्याहूनहि तेच तुला तें अधिक चांगल्या रीतीनें फोड करुन समजावून सांगतील. तरी पण शरीराच्या वजनाचा उपयोग करायचा म्हणजे, शरसंधान करतांना, तूं राहतोस तसें, ताठ, निश्चल उभें राहायचें नाहीं; तर त्या वेळीं (अर्जुनाचे खांदे पकडून त्याला मागें-पुढें ढकलीत) हें असें, मागें-पुढें झुकायचें...कसलेल्या धनुर्धराचें शरीर, वाऱ्याच्या प्रत्येक झुळकीबरोबर समभावानें सरोवरांत मागेंपुढें झुकणाऱ्या कमलाप्रमाणें, दोरी ओढतांना आणि बाण सोडतांना डौलानें अवकाशांत डुललें पाहिजे. आतां ठेवशील ना ध्यानांत नीट ? अं ?

**अर्जुन :** होय, ताताजी. मला तें नीट ध्यानांत ठेवलेंच पाहिजे. कारण साऱ्या पृथ्वींतील सर्वश्रेष्ठ











धनुर्धर व्हायचें, ही तर माझी खास वैयक्तिक महत्त्वाकांक्षा आहे.

**भीष्म** : ( अर्जुनाच्या ' वैयक्तिक ' या शब्दानें दचकून कांहींशा दुःखी नजरेनें कठोर स्वरांत ) छेः ! वत्सा ! कोणत्याहि प्रकारची वैयक्तिक महत्त्वाकांक्षा तूं अगदीं टाळली पाहिजेस. वैयक्तिक महत्त्वाकांक्षेनें पछाडलेला माणूस, आपल्या स्वार्थी कार्यभागाच्या निर्वाहाला पुरतील तेवढ्याच आपल्या अंगच्या शक्ती उपयोगांत आणील, त्याहून अधिक शक्तींचा वापर करण्याचा तो प्रयत्न करणार नाहीं. त्या तो तशाच सुप्त राहूं देईल. मागासलेल्या ठेवील. वायां जाऊं देईल. विश्व-कल्याणाचें अमर्याद सामर्थ्य असलेल्या आपल्या त्या शक्तींच्या कार्यक्षमतेला तो मर्यादा घालील. त्यांना कुंठित करील. याच्या उलट, जींत वैयक्तिक महत्त्वाकांक्षेला वाव नाहीं, अशी माणसाची अंतः-प्रेरणा जेव्हां कार्यक्षम होईल, तेव्हांच माणसांतील सर्व शक्ती पूर्णपणें विकसित होतील आणि साऱ्या जगालाहि त्यांचा पूरेपूर फायदा मिळेल. वैयक्तिक महत्त्वाकांक्षेनें प्रेरित झालेला माणूस, फार तर थोडा वेळपर्यंत स्वतःचा अल्पसा फायदा करून घेईल; पण तसें करतांना, जगाच्या स्वतःच्या मालकी हक्काचें असलेलें असें बरेंचसें त्याच्यापासून हिरावून घेऊन, एकंदरींत तो जगाचें फार मोठें नुकसानच करील; आणि पार्था, तुला माहीत आहे कीं, तें पाप आहे. आलें ध्यानांत तुझ्या नीट ?

**अर्जुन** : होय ताताजी. आलें, अगदीं नीट आलें. मी धनुर्विद्येंत परिपूर्णता मिळवीन, असें मीं म्हटलें असतें, तर तें अधिक बरोबर झालें असतें; होय ना ?

**भीष्म** : ( स्मित करीत ) नाहीं. तेंहि चुकीचेंच ठरलें असतें. मनुष्य केव्हांहि परिपूर्णता ' मिळवूं ' शकत नाहीं. तो स्वतःच परिपूर्ण होतो. परिपूर्णता ही तुझ्याहून निराळी, तुझ्या बाहेर असणारी अशी कांहीं गोष्ट असती तर, तिचा पाठलाग करावा, तिला गांठावें, पकडावें, हस्तगत करावें, असें तुला वाटणें रास्त होतें. पण पार्था, परिपूर्णता तुझ्यांत आहे, माझ्यांत आहे, प्रत्येक जीवमात्रांत आहे आणि सत्य ज्ञान, हेंच त्या परिपूर्णतेची जाणीव होण्याचें,–खरोखर तद्रूप होण्याचें साधन आहे. त्या परिपूर्णतेवर संस्कार करून तिचा विकास करील, त्या परिपूर्णतेला बहिर्मुख करून स्वतः तुलाच सर्वांशीं परिपूर्ण बनवील, विश्वकल्याणासाठीं तुला पूर्णपणें पात्र ठरवील, अशी एकच व्यक्ति या साऱ्या जगांत आहे;–आणि ती म्हणजे तुझे गुरु. ( द्रोणांकडे अंगुलिनिर्देश करून ) त्यांच्यावर प्रेम कर. त्यांची आज्ञा पाळ. ते सांगतील तें ऐक. ते दाखवतील त्या मार्गानें जा. सत्य ज्ञान महासागराप्रमाणें असीम, अगाध आहे, पार्था ! गुरूंच्या मदतीवांचून, त्यांच्या मार्गदर्शनावांचून, त्यांत टिकाव धरणें, त्यांतून पार होणें, दुरापास्त आहे. आणि म्हणूनच तुला परिपूर्ण व्हायचें असेल, तर तें साध्य करून घेण्याचा एकच मार्ग, गुरुवरचें आपलें प्रेम हा आहे, हें विसरूं नकोस.

**अर्जुन** : होय, ताताजी.

**भीष्म** : ( त्याचें मस्तक कुरवाळीत ) शाबास, वत्सा ! शाबास ! आणि आतां आणखी एक सांगायचें, म्हणजे जें कांहीं शिकत असशील तें लवकर शिकून घे...आणि त्यांतसुद्धां हें लक्षांत ठेव कीं, गुरुवरील प्रेमामुळें विद्येची खोली आणि विस्तार हीं जशीं वाढतात, तसाच त्यामुळें तिच्या प्राप्तीचा वेगहि वाढत असतो. म्हणून आपल्या गुरुवर इतकें प्रेम कर कीं, स्वतःला विसरून तूं त्यांच्याशीं समरस झाला पाहिजेस...काय, करशील ना ?

**अर्जुन** : होय, ताताजी, करीन.

**भीष्म** : ठीक. तर मग वत्सा, तुला आतां इथेंच सोडून इतर मुलांचा समाचार घ्यायला निघतों मी––

**अर्जुन** : ( साष्टांग नमस्कार घालून ) नमस्कार, ताताजी.

**भीष्म** : ईश्वर तुझें कल्याण करो, वत्सा !

[ त्याला वर उठवतो. त्याच्या कपाळाचें चुंबन घेतो. दीर्घ निःश्वास टाकून त्याला आपल्या मिठींतून मुक्त करतो. सावकाश वळून रुबाबदारपणें लांब लांब पावलें टाकीत मागील बाजूस जातो व तेथें वेगवेगळ्या खेळांत गुंग असलेल्या राजपुत्रांच्या मेळाव्यांत मिसळून दिसेनासा होतो. ]








**अर्जुन** : ( आवाज चढवून ) गुरुजी—

**द्रोण** : काय आहे, पार्था ?

**अर्जुन** : ( तक्रारीच्या स्वरांत ) मी इकडे मोठ्या अडचणींत सांपडलों आहें, गुरुजी.

**द्रोण** : ( त्रासिकपणें ) तूं नेहमींच अडचणींत असतोस. आतां काय संकट ओढवलें तुझ्यावर ?

**अर्जुन** : नेहमींचेंच, गुरुजी ! साधनेला सुरुवात केली कीं, माझे दंड दुखायला लागतात. ताताजी भीष्म म्हणत होते कीं, शरीराच्या वजनानीट उपयोग केला, तर बाहूंवरचा ताण—

**द्रोण** : ( अर्जुनाजवळ येऊन त्याला करड्या स्वरांत ) ताताजी भीष्म म्हणत होते ! विसराळू पोरा, आज कित्येक महिने तुझ्या कानींकपाळीं मीहि तेंच ओरडतों आहें. कित्येक दिवसचे दिवस तें तुला समजावून सांगण्यांत मीं खर्ची घातले आहेत; पण तुझें लक्ष कुठें आहे तिकडे ? त्यांतला शब्दन् शब्द तूं विसरून जातोस; आणि जसें कांहीं पहिल्याच दिवशीं शिकायला उभें राहावें, त्याप्रमाणें दररोज आपल्या लक्ष्यासमोर शरसंधान करण्यासाठीं उभा राहातोस !

**अर्जुन** : ( काकुळतीला येऊन ) क्षमा करा मला, गुरुजी. इतक्या ममतेनें आपण मला शिकवितां आणि तें सारें मी कसें विसरून जातों, कळतच नाहीं मला.

**द्रोण** : तुला कळत नाहीं, पार्था ! पण मला कळतें. त्यांतली खरी अडचण ही आहे कीं, तुझें साध्यच मुळीं चुकीचें आहे—अगदीं चुकीचें आहे.

**अर्जुन** : साध्य चुकीचें आहे ? पण गुरुजी, मी तर नेहमीं माझ्या 'लक्ष्या'वरच नेम धरीत असतों. हो - अगदीं सरळ.

**द्रोण** : तुझ्या लक्ष्यविषयक साध्याबद्दल बोलत नव्हतों मी. तुझें ध्येय, तुझें प्रयोजन, तुझा हेतु—ज्या उद्देशानें तूं हें शिक्षण घेत आहेस तो—त्याबद्दल बोलतों आहें मी. तो सदोष आहे !

**अर्जुन** : धनुर्विद्या शिकण्यांतला माझा उद्देश !....बरें !

**द्रोण** : तुझा उद्देश काय आहे, पार्था !.. धनुर्धर म्हणून कीर्ति मिळवायची -बस्स्, एवढाच ! विद्यार्जन करीत असतांना त्यांतील प्रत्येक क्षणाला तुझें अंतःकरण, जगांतला सर्वश्रेष्ठ धनुर्धर म्हणून लोक तुझी वाखाणणी करतील, त्या दिवसाच्या विचारानें भारावलेलें असतें. हातांतील कामाच्या चिंतनानें नव्हे. आतां खरें सांग- मोकळ्या मनानें कबूल कर. मी म्हणतों तें बरोबर आहे कीं नाहीं ?

**अर्जुन** : ( मान खालीं घालून ) होय, गुरुजी. बरोबर आहे.

**द्रोण** : आणि म्हणूनच तुझी व्हावी तशी प्रगति होत नाहीं. तुझें अंतःकरण कामाच्या पारितोषिकाच्या विचारानें कांठोकांठ भरून गेलेलें असतें. प्रत्यक्ष त्या कामाबद्दलच्या विचारांना त्यांत अवसरच राहात नाहीं. थोडक्यांत म्हणजे तूं अधम अर्थानें ' कार्मी ' आहेस.

**अर्जुन** : ' कार्मी ' ? अधम अर्थानें ? कोणता तो अर्थ गुरुजी ?

**द्रोण** : " कर्मणा स्वार्थः " स्वतःचे स्वार्थी हेतू सफल करण्यासाठीं केवळ साधन म्हणून श्रमांचा वापर करणारा मनुष्य ! माझ्या गुरूकडे मी जर अशा रीतीनें धनुर्विद्येच्या अभ्यासाला सुरुवात केली असती, तर धनुष्य कसें उचलावें, तें देखील शिकतां आलें नसतें मला. मग अस्त्रप्रयोगाची गोष्ट दूरच !

**अर्जुन** : पण गुरुजी, बोलतांबोलतां एकदां तुम्हीं स्वतःलासुद्धां ' कार्मी ' म्हटल्याचें आठवतें मला.

**द्रोण** : होय, पण तें मध्यम अर्थानें. ' कर्म एव अर्थः " -स्वतःचे श्रम हेंच साध्य आणि तेंच त्याचें पर्यवसान, असें समजणारा माणूस या अर्थानें—

**अर्जुन** : आणि हा देखील केवळ मध्यमच अर्थ ! मग त्या शब्दाचा आणखी एकादा उत्तम अर्थ आहे कीं काय, गुरुजी ?

**द्रोण** : होय आहे. " कर्मणा परार्थः । " स्वतःला यत्किंचित्‌हि लाभ नसला, तरी इतरांना आपल्या परिश्रमांच्या फलाचा फायदा मिळावा, अशी एकमेव इच्छा धरणारा माणूस—

**अर्जुन** : आलें ध्यानांत माझ्या, गुरुजी. आणि तरीहि पण मला वाटतें कीं, स्वतःला कांहींच लाभ नसतांना केवळ दुसऱ्यांना आपल्या श्रमांचा फायदा



अनुक्रमणिका






मिळावा, म्हणून एकाद्यानें आपल्या साऱ्या आयुष्य-भर कष्ट करावेत,–धडपड करावी–हें ऐकायला कितीहि साधुत्वाचें वाटलें, तरी तें कांहींसें न पटणारें, निर्दयपणाचेंच नाहीं का, गुरुजी ?

**द्रोण** : बुद्धीला न पटणारें ! निर्दयपणाचें ! पार्था, साधुत्वाला दयेचे, तर्कबुद्धीचे नियम लागू नाहींत. ( अर्जुनाकडे क्षणमात्र टक लावून पाहतो. दीर्घ निःश्वास सोडून गंभीर स्वरानें बोलूं लागतो ) तूं अजून लहान आहेस. या वयांत तुझ्याशीं मीं यासंबंधीं बोलणें कदाचित् अवेळीं होईल, तरी पण माझे हे शब्द नीट सावधान चित्तानें ऐक आणि कधींहि पुसले जाणार नाहींत, अशा रीतीनें आपल्या अंतःकरणावर ते कोरून ठेव. तुझ्या भावी आयुष्यांत तुला कधीं साधुत्वाच्या आसपास फिरकण्याची संधि लाभली तर तेव्हां तुला आढळून येईल, पार्था, कीं साधुत्व जेव्हां आपलें अधिराज्य गाजवीत असतें, तेव्हां बुद्धि धुळींत धडपडत असते; साधुत्व सिंहासनावर बसतें–राजा होतें, तेव्हां बुद्धि बुभुक्षित, लज्जित आणि निराश्रित अशी निर्वासित बनते. त्या वेळीं तुला उमजेल पार्था कीं, साधुत्व हें बरोबर नसतें आणि चूकहि नसतें. तर तें केवळ बलिष्ठ–अभेद्य, अविचल रीतीनें बलिष्ठ–असतें ! ( थोडासा वेळपर्यंत कांहींसा स्वतःच्या भावनेच्या उत्कटतेच्या आहारीं गेलेला दिसतो. सिंहानें एकाद्या उर्मट कोल्ह्याला हिसडावें त्या-प्रमाणें अर्जुनाचे खांदे पकडून त्याला गदगदां हलवीत मेघगर्जनेच्या गंभीर स्वरानें ) बिचाऱ्या, मूढ, अहंमन्य बालका ! तेव्हां तुझ्या ध्यानांत येईल कीं, साधुत्व म्हणजेच प्रत्यक्ष परमेश्वर ! ( द्रोणांच्या वक्तृत्वौघानें गडबडलेला अर्जुन भीतीनें कांपूं लागतो. द्रोण हळूहळू भानावर येतो. अर्जुनाचे पकडलेले खांदे सोडून एक पाऊल मागें सरकतो. अर्जुनाची भीतिग्रस्त मुद्रा पाहून समजावणीच्या शांत स्वरांत ) पार्था ! मीं तुला घाबरवलें–घाबरवलें –वाईट वाटतें मला,–पण यावरून धडा घे कीं, आपल्या चिमुकल्या डोक्याच्या फार फार वर असलेल्या मोठमोठ्या विषयांबद्दल असें परिहासानें बोलणें गर्ह्य आहे. चला–आतां आपण आपल्या कामाला लागूं या. आतां तरी तुझ्या नीट ध्यानांत आलें असेल कीं, धनुर्विद्येंत प्रावीण्य मिळविण्या-साठीं, मी काय बोलतों तें ऐकायला, आपले कान तूं-सज्ज ठेवले पाहिजेस. आपली दृष्टि 'लक्ष्या'-वर स्थिर ठेवली पाहिजे. शरीर आणि अवयव धनुष्यबाणांना वाहिले पाहिजेत; आणि आपलें अविचल चित्त या तिहींवर केंद्रित केलें पाहिजे. हें सारें नीट ध्यानांत धरलेंस, तर आतांचें माझें बोलणें वायां नाहीं जाणार. हं ! तर मग पाहूं दे आतां मला सकाळपासून बाण मारण्याची कशी साधना करतो आहेस ती ! म्हणजे तुझ्या हातून काय चुका होतात तें मला कळेल आणि मला त्या दुरुस्त करतां येतील...आणि फिरून एकवार सांगतों...ऐक...विसरूं नकोस–तुझ्या सर्व चित्त-वृत्ती शरसंधानांत मग्न झाल्या आहेत. तुझी दृष्टि 'लक्ष्या'वर खिळली आहे. तुझे कान माझ्या आवाजाशीं जखडले आहेत. तुझें शरीर आणि अवयव यांना धनुष्याची दोरी आणि बाण यांशिवाय कशाच्याहि स्पर्शसंवेदना उरल्या नाहींत. हं, कर सुरुवात आतां—

[ अर्जुन शरसंधानाला सज्ज होतो. त्याचें शरीर आणि अवयव पूर्वीप्रमाणेंच ताठ आणि ताणलेले असतात. द्रोण त्याच्या हालचालींचें बारकाईनें निरीक्षण करीत असतो. एकलव्य प्रवेश करतो; आणि पुढील बाजूस डावीकडे उभा राहतो. तें त्या दोघांच्याहि ध्यानांत येत नाहीं. ]

**एकलव्य** : आई म्हणाली ती जागा बहुतेक हीच असावी. हरळीनें व्यापलेलें विशाल, विस्तृत मैदान; त्यावर सुंदर सुंदर पोशाख केलेले, रत्नभूषणें घातलेले, धनुष्य, गदा आणि खड्गयुद्धाची तालीम करीत असलेले सुंदर तरुण राजपुत्र आणि त्यांना शिकवीत असलेला एक उंच, धीरोदात्त ब्राह्मण; असेंच वर्णन केलें होतें तिनें. तें सारें बरोबर जुळतें इथें. ( त्याची नजर द्रोण आणि अर्जुन यांच्यावर स्थिर होते. तो एकदम दचकतो व स्वतःशींच कांहींशा भीतिग्रस्त स्वरानें बोलूं लागतो. ) काय ? जगांतील सर्वश्रेष्ठ धनुर्धर होण्यासाठीं मी ज्यांची मदत मागणार तेच का हे महाभाग द्रोणा-चार्य ? छे ! छे ! ! शक्यच नाहीं. काय हें ! त्यांचा तो शिष्य एकाद्या नवशिक्याप्रमाणें इतक्या





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




अनुक्रमणिका

चुकीच्या पद्धतीनें शरसंधान करतो आहे आणि हे गुरुजी, अेक अक्षरसुद्धां विरुद्ध न बोलतां, मुकाट्यानें पाहात आहेत...नाहीं नाहीं ! कांहीं तरी बोलताहेत ते.

[ एकलव्य द्रोणांनीं अर्जुनाला उद्देशून उच्चारलेले शब्द कान देऊन ऐकतो. ]

**द्रोण :** पार्था, आतां तूं शरसंधान करीत असतांना तुझें शरीर ताठलेलें होतें. पायाच्या बोटां-पासून तों मानेपर्यंत तें अगदीं घट्ट, निष्क्रिय होतें. पण खरें म्हणजे, पार्था, त्यांतील बहुतेक वेळ तें लवचिक आणि तळपतें असायला हवें होतें. आतां मी सांगतों तिकडे नीट लक्ष दे. पावलें जमिनीवर घट्ट टेक. टांचा वर उचल आणि पायांमधून आपल्या शरीराचा भार एका पावलावरून दुसऱ्या पावलावर नेण्याचा आणि दुसऱ्या पावलावरून परत पहिल्या पावलावर आणण्याचा प्रयत्न कर. तें करतांना शरीर पुढें झुकूं दे. शरीराला मिळणारे हे झोके आणि शरीराच्या भाराची एका पावलावरून दुसऱ्या पावलावर व दुसऱ्या पावलावरून परत पहिल्यावर होणारी अदलाबदल,-धनुष्याची दोरी ओढणें आणि बाण सोडणें यांच्या अगदीं बरोबरीनें-त्याच कालांत आणि त्याच लयींत-झाली पाहिजेत. आतां प्रयत्न करून पाहा. मीं जें हें सारें शब्दांत सांगितलें, तें तूं आतां कृतींत उतरविण्याचा अभ्यास कर.

[ अर्जुन प्रयत्न करतो, पण त्याला फारसें यश आल्यासारखें दिसत नाहीं. द्रोणांची त्याच्यावर बारीक नजर असते. त्यांच्या चेहऱ्यावर त्रासाची आणि असंतोषाची छटा दिसते. ]

**एक० :** ( आश्चर्ययुक्त समाधानानें ) आहाहा ! किती विलक्षण....! तेच असावेत ते ! ( थांबून पुन्हां ऐकूं लागतो. )

**द्रोण :** नाहीं. पार्था ! तुझ्यांत अजून पुरेशी सुधारणा नाहीं झाली. ( आपल्या शिष्याच्या जवळ जाऊन अगदीं सावकाश आणि त्याला पटेल अशा रीतीनें प्रत्येक बाब अलग अलग आणि विस्तार करून त्याला पुन्हां सांगूं लागतात. ) हं... आतां प्रथम डावा पाय पुढें ठेवून उभा राहा....

[ पुढील बाजूस त्या दोघांपासून पुष्कळ दूर आणि अजून त्या दोघांना न दिसलेला एकलव्य, द्रोणांनीं दिलेल्या सूचनांप्रमाणें, त्यांनीं सागितलेली प्रत्येक हालचाल अर्जुनाइतक्याच सावधान चित्तानें करीत असतो. ]

**द्रोण :** . . .दोन्ही टांचा जमिनीवरून उचल. आतां सर्व शरीराचा भार, पुढच्या पायाच्या चवड्यावर तोलून धर. होय, डाव्या चवड्यावर. मस्तक वांकव मान आणि धड पुढें झुकूं दे. बरोबर ! तसेंच ! डावा हात लांबव. धनुष्य हातांत घट्ट पकडून धर आणि उजवा हात लांबव. आंगठ्यानें दोरीची नीट पकड घे. दोरी आणि धनुष्याला जोडलेलें बाणाचें पुच्छ यांवर बोटें घट्ट होऊं देत. आतां त्याच स्थितींत या साऱ्या गोष्टी तुझ्या स्मरणांत राहीपर्यंत, तसाच उभा राहा. ( एक क्षणभर स्तब्ध राहतात. ) राहिल्या साऱ्या स्मरणांत ? तर मग आतां आपल्या नेहमींच्या संवयीप्रमाणें धनुष्याची दोरी खेंचण्यासाठीं केवळ आपला उजवा हात वांकवण्याऐवजीं, ती ओढतांना आपलें धड, मान आणि मस्तक हीं मागें झुकव; आणि या दोन्हीहि हालचाली करीत असतांना, त्याच लयींत आणि त्याच कालांत आपल्या शरीराचा भार आपल्या पुढल्या—डाव्या-पायावरून आपल्या मागल्या—उजव्या—पायावर आण. ( अर्जुन द्रोणाच्या दृष्टीसमोर आणि एकलव्य त्यांच्या पाठीमागें, त्यांच्या सूचनांबरहुकूम हालचाली करतात. ) बरोबर-अगदीं बिनचूक. आतां याच हालचाली, त्यांतील प्रत्येक तपशील पूर्णपणें आत्मसात् होईपर्यंत पुन्हां पुन्हां करून पाहा. त्यांवर पूर्ण प्रभुत्व मिळेपर्यंत त्या नीट घटव. त्यांचा स्वाध्याय कर. ( अर्जुन त्याप्रमाणें करूं लागतो. )

**एकलव्य :** निखालस हे महाभाग द्रोणाचार्यच. इतक्या थोड्या शब्दांत आणि इतक्या थोड्या वेळांत त्यांच्याशिवाय दुसरा कोण एकाद्या नवाशिक्याचा कसलेला धनुर्धर बनवूं शकणार ? तो बेटा पार्थ इतक्यांतच उत्कृष्ट तिरंदाज झालेला दिसूं लागला कीं ! त्याचें कशाला ! त्यांचे केवळ शब्द ऐकून त्यांप्रमाणें केल्यानें माझ्यांतसुद्धां किती सुधारणा झाली ! ( अर्जुनाचें अनुकरण करून








त्याच्याचसारख्या पुन्हां हालचाली करुन पाहातो. थांबतो. खात्री पटल्याच्या स्वरांत -) खरेंच, किती सोपें करुन सांगितलें त्यांनीं ! होय ! शरीराला झोंके दिल्यामुळें दंडावरचा ताण उतरुन त्याचा थकवा कमी होतो खरा. या रीतीनें मुळींच न थकतां माणसाला सारा दिवसमुद्धां सारखें शर-संधान करतां येईल. अं ? ते महाभाग कांहीं तरी बोलताहेत...त्यांचा शब्दन् शब्द न चुकतां ऐकला पाहिजे मला.

**द्रोण** : (अर्जुनाकडे समाधानयुक्त नजरेनें पाहून) ठीक. आतां अगदीं निर्दोष झालें सगळें. आतां सांग मला, पार्था; ज्या वृक्षाला तुझें लक्ष्य टांगलें आहे, तो किती मोठा आहे ?

**अर्जुन** : (वर न पाहतां आपल्याच कार्यांत मग्न राहून) वृक्ष ? मला नाहीं दिसत वृक्ष. मला फक्त एक काळा ठिपका-माझ्या लक्ष्याचा मध्यबिंदु-तेवढा दिसतो.

**द्रोण** : तुझ्या पलीकडे चाललेल्या खड्गांच्या खणखणाटाचा तुला त्रास होतोय् का ?

**अर्जुन** : (अजून आपल्याच कामांत गर्क असलेला) खणखणाट ! मला नाहीं ऐकूं येत तो ! मला फक्त एकच आवाज-आपला आवाज मात्र ऐकूं येतो.

**द्रोण** : या एवढ्या कडक उन्हामुळें तुला थकवा तर नाहीं ना वाटत ?

**अर्जुन** : (अद्यापि आपल्याच कामांत गढलेला असून वर न पाहतां) मला नाहीं कळत-नाहीं सांगतां येत. हाताला घासणाऱ्या धनुष्याच्या दोरीचा झोंबणारा स्पर्श तेवढा मला कळतो.

**द्रोण** : (टाळी वाजवून) उत्तम. फार उत्तम ! आतां थांब आणि विश्रांति घे थोडा वेळ.

**अर्जुन** : (अभ्यास थांबवून) गुरुजी, शर-संधान करीत असतांना, हा वृक्ष मला दिसत कसा नव्हता ? आतां तर मला वृक्ष आणि 'लक्ष्य' दोन्ही दिसत आहेत.

**द्रोण** : नाहीं आलें ध्यानांत तुझ्या ? तर मग पलीकडून येणारा खड्गांचा खणखणाट तुझ्या कानांना कसा ऐकूं आला नाहीं ? आतां ऐकूं येत असला पाहिजे तो. तसेंच सूर्याचे प्रखर किरण-ज्यांनीं पायांखालची जमीन तापून चटके बसताहेत-ते देखील तुला कसे जाणवले नाहींत ? या सर्वांचें कारण एकच—एकाग्रता. कोणत्याहि विषयाच्या अभ्यासांत प्रगति करण्यासाठीं अगदीं अपरिहार्यपणें आवश्यक असलेली एक महत्त्वाची बाब. खरीखुरी एकाग्रता साध्य झाली कीं, खऱ्या धनुर्धराला त्याच्या 'लक्ष्या'व्यतिरिक्त कांहींहि दिसत नाहीं. त्यानें सोडलेल्या बाणांच्या खणखणाटावेगळें दुसरें कांहीं ऐकूं येत नाहीं. हातावर होणाऱ्या धनुष्याच्या दोरीच्या घर्षणाव्यतिरिक्त कशाचाहि स्पर्श जाणवत नाहीं. आणि स्वतःच्या गुरुबद्दलच्या विचारावेगळा कोणताहि विचार त्याच्या चित्तांत ठरत नाहीं. हीच एकाग्रता, पार्था !

**एकलव्य** : (कष्टानें एकेक अक्षर उच्चारीत) ए-का-ग्र-ता, असें होय ? नीट ध्यानांत ठेवलें पाहिजे मला हें. पुन्हां बोलूं लागले वाटतें ? (पुन्हां ऐकूं लागतो.)

**द्रोण** : आतां शरसंधान करतांना कराव्या लागणाऱ्या हालचालींवर तूं प्रभुत्व संपादन केलेंस. तसेंच चित्त एकाग्र करण्याची आपली शक्ति सिद्ध केलीस. मी तुला प्रभावी योद्धा बनवूं शकेन अशी आतांपावेतों कधीं वाटली नव्हती इतकी आशा आतां मला वाटूं लागली आहे.

**अर्जुन** : प्रभावी योद्धा ? पण गुरुजी, मला तर जगांतला सर्वश्रेष्ठ धनुर्धर व्हायचें आहे !

**एक०** : काय ? यालामुद्धां ? पण कशासाठीं कोण जाणें !

**द्रोण** : तूं जगांतला सर्वश्रेष्ठ धनुर्धर न व्हायला मला तरी कांहीं कारण दिसत नाहीं. पार्था ! यापुढें तें सारें तुझ्याच हातांत आहे.

**एक०** : (हलक्या आवाजांत) तें त्याच्या हातीं असेल तर तें माझ्याहि हातीं कां असूं नये ?

**अर्जुन** : म्हणजे गुरुजी, अचूक हालचाली करतां येऊं लागल्या आणि चित्त एकाग्र करण्याची शक्ति अंगांत आली, म्हणजे कुणालाहि जगांतला सर्वश्रेष्ठ धनुर्धर होतां येईल, म्हणतां ?

**द्रोण** : नाहीं, पार्था, त्यासाठीं गुरुवर गाढ आणि उत्कट प्रेम असणें, हें आणखी एक आवश्यक तत्त्व आहे.



अनुक्रमणिका

चुकीच्या पद्धतीनें शरसंधान करतो आहे आणि हे गुरुजी, अक्षरसुद्धां विरुद्ध न बोलतां, मुकाट्यानें पाहात आहेत... नाहीं नाहीं ! कांहीं तरी बोलताहेत ते.

[ एकलव्य द्रोणांनीं अर्जुनाला उद्देशून उच्चारलेले शब्द कान देऊन ऐकतो. ]

**द्रोण :** पार्था, आतां तूं शरसंधान करीत असतांना तुझें शरीर ताठलेलें होतें. पायाच्या बोटां-पासून तों मानेपर्यंत तें अगदीं घट्ट, निष्क्रिय होतें. पण खरें म्हणजे, पार्था, त्यांतील बहुतेक वेळ तें लवचिक आणि तळपतें असायला हवें होतें. आतां मी सांगतों तिकडे नीट लक्ष दे. पावलें जमिनीवर घट्ट टेक. टांचा वर उचल आणि पायांमधून आपल्या शरीराचा भार एका पावलावरून दुसऱ्या पावलावर नेण्याचा आणि दुसऱ्या पावलावरून परत पहिल्या पावलावर आणण्याचा प्रयत्न कर. तें करतांना शरीर पुढें झुकूं दे. शरीराला मिळणारे हे झोके आणि शरीराच्या भाराची एका पावलावरून दुसऱ्या पावलावर व दुसऱ्या पावलावरून परत पहिल्यावर होणारी अदलाबदल,-धनुष्याची दोरी ओढणें आणि बाण सोडणें यांच्या अगदीं बरोबरीनें-त्याच कालांत आणि त्याच लयींत-झाली पाहिजेत. आतां प्रयत्न करून पाहा मीं जें हें सारें शब्दांत सांगितलें, तें तूं आतां कृतींत उतरविण्याचा अभ्यास कर.

[ अर्जुन प्रयत्न करतो, पण त्याला फारसें यश आल्यासारखें दिसत नाहीं. द्रोणांची त्याच्यावर बारीक नजर असते. त्यांच्या चेहऱ्यावर त्रासाची आणि असंतोषाची छटा दिसते. ]

**एक० :** ( आश्चर्ययुक्त समाधानानें ) आहाहा ! किती विलक्षण....! तेच असावेत ते ! ( थांबून पुन्हां ऐकूं लागतो. )

**द्रोण :** नाहीं. पार्था ! तुझ्यांत अजून पुरेशी सुधारणा नाहीं झाली. ( आपल्या शिष्याच्या जवळ जाऊन अगदीं सावकाश आणि त्याला पटेल अशा रीतीनें प्रत्येक बाब अलग अलग आणि विस्तार करून त्याला पुन्हां सांगूं लागतात. ) हं... आतां प्रथम डावा पाय पुढें ठेवून उभा राहा....

[ पुढील बाजूस त्या दोघांपासून पुष्कळ दूर आणि अजून त्या दोघांना न दिसलेला एकलव्य, द्रोणांनीं दिलेल्या सूचनांप्रमाणें, त्यांनीं सांगितलेली प्रत्येक हालचाल अर्जुनाइतक्याच सावधान चित्तानें करीत असतो. ]

**द्रोण :** . . .दोन्ही टांचा जमिनीवरून उचल. आतां सर्व शरीराचा भार, पुढच्या पायाच्या चवड्यावर तोलून धर. होय, डाव्या चवड्यावर. मस्तक वांकव मान आणि धड पुढें झुकूं दे. बरोबर ! तसेंच ! डावा हात लांबव. धनुष्य हातांत घट्ट पकडून धर आणि उजवा हात लांबव. आंगठ्यानें दोरीची नीट पकड घे. दोरी आणि धनुष्याला जोडलेलें बाणाचें पुच्छ यांवर बोटें घट्ट होऊं देत. आतां त्याच स्थितींत या साऱ्या गोष्टी तुझ्या स्मरणांत राहीपर्यंत, तसाच उभा राहा. ( एक क्षणभर स्तब्ध राहतात. ) राहिल्या साऱ्या स्मरणांत ? तर मग आतां आपल्या नेहमींच्या संवयीप्रमाणें धनुष्याची दोरी खेंचण्यासाठीं केवळ आपला उजवा हात वांकवण्याऐवजीं, ती ओढतांना आपलें धड, मान आणि मस्तक हीं मागें झुकव; आणि या दोन्हीहि हालचाली करीत असतांना, त्याच लयींत आणि त्याच कालांत आपल्या शरीराचा भार आपल्या पुढल्या—डाव्या-पायावरून आपल्या मागल्या—उजव्या—पायावर आण. ( अर्जुन द्रोणाच्या दृष्टीसमोर आणि एकलव्य त्यांच्या पाठीमागें, त्यांच्या सूचनांबरहुकूम हालचाली करतात. ) बरोबर-अगदीं बिनचूक. आतां याच हालचाली, त्यांतील प्रत्येक तपशील पूर्णपणें आत्मसात् होईपर्यंत पुन्हां पुन्हां करून पाहा. त्यांवर पूर्ण प्रभुत्व मिळेपर्यंत त्या नीट घटव. त्यांचा स्वाध्याय कर. ( अर्जुन त्याप्रमाणें करूं लागतो. )

**एकलव्य :** निखालस हे महाभाग द्रोणाचार्यच. इतक्या थोड्या शब्दांत आणि इतक्या थोड्या वेळांत त्यांच्याशिवाय दुसरा कोण एकाद्या नवशिक्याचा कसलेला धनुर्धर बनवूं शकणार ? तो बेटा पार्थ इतक्यांतच उत्कृष्ट तिरंदाज झालेला दिसूं लागला कीं ! त्याचें कशाला ! त्यांचे केवळ शब्द ऐकून त्यांप्रमाणें केल्यानें माझ्यांतसुद्धां किती सुधारणा झाली ! ( अर्जुनाचें अनुकरण करून

त्याच्याचसारख्या पुन्हां हालचाली करून पाहातो. थांबतो. खात्री पटल्याच्या स्वरांत- ) खरेंच, किती सोपें करून सांगितलें त्यांनीं ! होय ! शरीराला झोके दिल्यामुळें दंडावरचा ताण उतरून त्याचा थकवा कमी होतो खरा. या रीतीनें मुळींच न थकतां माणसाला सारा दिवसमुद्धां सारखें शरसंधान करतां येईल. अं ? ते महाभाग कांहीं तरी बोलताहेत...त्यांचा शब्दन् शब्द न चुकतां ऐकला पाहिजे मला.

**द्रोण** : ( अर्जुनाकडे समाधानयुक्त नजरेनें पाहून ) ठीक. आतां अगदीं निर्दोष झालें सगळें. आतां सांग मला, पार्था; ज्या वृक्षाला तुझें लक्ष्य टांगलें आहे, तो किती मोठा आहे ?

**अर्जुन** : ( वर न पाहतां आपल्याच कार्यांत मग्न राहून ) वृक्ष ? मला नाहीं दिसत वृक्ष. मला फक्त एक काळा ठिपका-माझ्या लक्ष्याचा मध्यबिंदु-तेवढा दिसतो.

**द्रोण** : तुझ्या पलीकडे चाललेल्या खड्गांच्या खणखणाटाचा तुला त्रास होतोय् का ?

**अर्जुन** : ( अजून आपल्याच कामांत गर्क असलेला ) खणखणाट ! मला नाहीं ऐकूं येत तो ! मला फक्त एकच आवाज-आपला आवाज मात्र ऐकूं येतो.

**द्रोण** : या एवढ्या कडक उन्हामुळें तुला थकवा तर नाहीं ना वाटत ?

**अर्जुन** : ( अद्यापि आपल्याच कामांत गढलेला असून वर न पाहतां ) मला नाहीं कळत-नाहीं सांगतां येत. हाताला घासणाऱ्या धनुष्याच्या दोरीचा झोंबणारा स्पर्श तेवढा मला कळतो.

**द्रोण** : ( टाळी वाजवून ) उत्तम. फार उत्तम ! आतां थांब आणि विश्रांति घे थोडा वेळ.

**अर्जुन** : ( अभ्यास थांबवून ) गुरुजी, शरसंधान करीत असतांना, हा वृक्ष मला दिसत कसा नव्हता ? आतां तर मला वृक्ष आणि 'लक्ष्य' दोन्ही दिसत आहेत.

**द्रोण** : नाहीं आलें ध्यानांत तुझ्या ? तर मग पलीकडून येणारा खड्गांचा खणखणाट तुझ्या कानांना कसा ऐकूं आला नाहीं ? आतां ऐकूं येत असला पाहिजे तो. तसेंच सूर्याचे प्रखर किरण-ज्यांनीं पायांखालची जमीन तापून चटके बसताहेत-ते देखील तुला कसे जाणवले नाहींत ? या सर्वांचें कारण एकच—एकाग्रता. कोणत्याहि विषयाच्या अभ्यासांत प्रगति करण्यासाठीं अगदीं अपरिहार्यपणें आवश्यक असलेली एक महत्त्वाची बाब. खरीखुरी एकाग्रता साध्य झाली कीं, खऱ्या धनुर्धराला त्याच्या 'लक्ष्या'व्यतिरिक्त कांहींहि दिसत नाहीं. त्यानें सोडलेल्या बाणांच्या खणखणाटावेगळें दुसरें कांहीं ऐकूं येत नाहीं. हातावर होणाऱ्या धनुष्याच्या दोरीच्या घर्षणाव्यतिरिक्त कशाचाहि स्पर्श जाणवत नाहीं. आणि स्वतःच्या गुरुबद्दलच्या विचारावेगळा कोणताहि विचार त्याच्या चित्तांत ठरत नाहीं. हीच एकाग्रता, पार्था !

**एकलव्य** : ( कष्टानें एकेक अक्षर उच्चारीत ) ए-का-ग्र-ता, असें होय ? नीट ध्यानांत ठेवलें पाहिजे मला हें. पुन्हां बोलूं लागले वाटतें ? ( पुन्हां ऐकूं लागतो. )

**द्रोण** : आतां शरसंधान करतांना कराव्या लागणाऱ्या हालचालींवर तूं प्रभुत्व संपादन केलेंस. तसेंच चित्त एकाग्र करण्याची आपली शक्ति सिद्ध केलीस. मी तुला प्रभावी योद्धा बनवूं शकेन अशी आतांपावेतों कधीं वाटली नव्हती इतकी आशा आतां मला वाटूं लागली आहे.

**अर्जुन** : प्रभावी योद्धा ? पण गुरुजी, मला तर जगांतला सर्वश्रेष्ठ धनुर्धर व्हायचें आहे !

**एक०** : काय ? यालासुद्धां ? पण कशासाठीं कोण जाणें !

**द्रोण** : तूं जगांतला सर्वश्रेष्ठ धनुर्धर न व्हायला मला तरी कांहीं कारण दिसत नाहीं. पार्था ! यापुढें तें सारें तुझ्याच हातांत आहे.

**एक०** : ( हलक्या आवाजांत ) तें त्याच्या हातीं असेल तर तें माझ्याहि हातीं कां असूं नये ?

**अर्जुन** : म्हणजे गुरुजी, अचूक हालचाली करतां येऊं लागल्या आणि चित्त एकाग्र करण्याची शक्ति अंगांत आली, म्हणजे कुणालाहि जगांतला सर्वश्रेष्ठ धनुर्धर होतां येईल, म्हणतां ?

**द्रोण** : नाहीं, पार्था, त्यासाठीं गुरुवर गाढ आणि उत्कट प्रेम असणें, हें आणखी एक आवश्यक तत्त्व आहे.



अनुक्रमणिका

**अर्जुन :** अर्थात्, गुरुजी. माझें आपल्यावर किती प्रेम आहे, हें आपण जाणतांच—

**एक० :** ( आवेगानें ) मलाहि त्यांच्याबद्दल अत्यंत आदर वाटतो.

**द्रोण :** हं ! तुझें माझ्यावर प्रेम असावें, हें तुझ्या हिताचेंच आहे, पार्था !

**अर्जुन :** तर मग, गुरुजी, या तिन्ही गोष्टी साध्य झाल्या कीं, धनुर्विद्येंत पारंगतता मिळाली; असेंच ना !

**द्रोण :** मुळींच नाहीं, पार्था ! याशिवाय आणखी एक गोष्ट आवश्यक आहे. पण तुझ्यापुरतेंच बोलायचें तर तुला ती आधींच लाभली आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं !

**एक० :** ( गोंधळून ) आणखी एक गोष्ट ? आणि ती ह्या कुमाराला आधींच लाभली आहे ! काय असेल, कांहीं कळत नाहीं. कदाचित् मलाहि ती लाभली नसेल कशावरून ?

**अर्जुन :** गुरुजी, कोणती ती चौथी गोष्ट ?

**द्रोण :** चौथा आवश्यक घटक म्हणजे, पार्था, अगदीं मनापासून शिष्याला विद्यादान करण्याची गुरूची तयारी. तुझ्या बाबतींत, तूं माझ्या जवळ शिकायला सुरुवात केलीस, तेव्हांपासूनच तुला ती लाभली आहे. ( अर्जुनाचें मस्तक कुरवाळीत ) तुला शिकविणें मला किती आवडतें हें तुला माहीतच आहे. आतां धनुर्विद्येच्या प्राथमिक भूमिकेवर तूं प्रभुत्व मिळविलेंस; कार्यमग्न असतांना एकाग्रता कशी साधायची हें शिकलास; गुरूवर तुझी उत्कट भक्ति आहे आणि गुरूचीहि तुला प्रेमानें शिकविण्याची तयारी आहे. यापुढें आतां फक्त अखंड आणि अविश्रान्त साधना केलीस कीं, तुझी धनुर्विद्या परिपूर्ण झालीच असें समज.

**एक० :** ( दुःखानें ) म्हणजे सारें माझ्या हातीं नाहीं तर ! मला शिकवायची त्यांची तयारी असली पाहिजे, हीच काय ती माझ्यांतली उणीव आहे. 'शिष्याला अगदीं मनापासून विद्यादान करण्याची गुरूची तयारी' असेंच म्हणाले नाहीं का ते ? हं ! ऐकूं या पुढें.

**अर्जुन :** साधना ? साधना मी अवश्य करीन. आपण सांगितली त्या पद्धतीनें अगदीं न चुकतां करीन. यालाच आपण धनुर्विद्येची प्राथमिक भूमिका म्हणतां ना ?

**द्रोण :** होय. प्राथमिक भूमिका-तिचा पाया ! गुरूनें शिष्याला तो समजावून द्यायचा आणि स्वतःच्या देखरेखीखालीं तो त्याच्या मनांत पक्का ठसवायचा. प्रथम, नीट ठाण मांडून पवित्र्यांत उभें राहणें, अचूक नेम धरणें, धनुष्याची दोरी ओढतांना शरीर, मस्तक आणि अवयव यांच्या यथाक्रम सुसूत्र हालचाली करणें आणि शेवटीं लक्ष्यावर बाण सोडतांना चित्त स्थिर राखणें, इतक्या गोष्टींचा त्यांत अंतर्भाव होतो. यांत सारें कांहीं आलें...आणि आज सकाळीं तूं जे परिश्रम केलेस त्यांनीं या तयारीचा पाया तूं फारच चांगल्या रीतीनें घातलास.

**एक० :** ( दुःखी मुद्रेनें ) आणि तसें म्हटलें तर मींसुद्धा तेंच केलें. पण त्यांनीं मला शिकवायला तयार व्हायला, मी त्यांचें प्रेम संपादन करूं शकलों नाहीं, तर काय उपयोग त्याचा ! आवश्यक गोष्ट म्हणून म्हणाले ते ती !

**अर्जुन :** मग गुरुजी, आतां जर या साऱ्या गोष्टी मला प्राप्त झाल्या आहेत, तर जगांतला सर्वश्रेष्ठ धनुर्धर कराल ना तुम्ही मला ? कराल ना ?

**द्रोण :** होय करीन अवश्य करीन, पार्था !

**अर्जुन :** हें आपलें वचन असें समजायचें का मीं, गुरुजी ?

**द्रोण :** म्हणजे ? अर्थात् समजायचें !

**अर्जुन :** ( टाळ्या वाजवून ) किती छान झालें ! आधीं पळत जाऊन ही आनंदाची वार्ता सांगतों सगळ्यांना.

[ पाठीमागच्या बाजूस असलेल्या मुलांच्या घोळक्याकडे आनंदानें उड्या मारीत नाचत-बागडत जातो. ]

**एक० :** त्यांनीं मला शिकवावें यासाठीं त्यांच्या प्रेमाचीच काय ती उणीव आहे माझ्या बाबतींत. बाकी सारें माझ्याच हातीं आहे. ( त्याच्या मुद्रेवर शंकेची छटा दिसूं लागते. ) पण मला ते आपला शिष्य म्हणून स्वीकारणार नाहींत, असें तर नाहीं ना होणार ? हो ! या साऱ्या राजकुमारांच्या बरोबरीनें शिकायला मी पात्र नाहीं,








असें जर कदाचित् त्यांना वाटलें तर ? ( सभोंवार दृष्टिक्षेप करून निरीक्षण करतो. पाठीमागच्या बाजूस असलेल्या बाहेर जाण्याच्या वाटेनें सर्व कुमार माध्याह्नस्नानासाठीं जात असलेले दिसतात ) खरेंच ! माझें मलाच वाटायला लागलें आहे कीं, या स्थानाच्या वैभवाच्या आणि भव्यतेच्या अपेक्षेनें मी किती क्षुद्र–किती दरिद्री ! दिसतसुद्धां असेन मी तसाच ! शंकाच नको. या सुंदर सुंदर पोशाकांच्या आणि रत्नाभरणांनीं नटले-ल्या राजपुत्रांच्या मेळाव्यांत मी म्हणजे केवळ— पण कांहीं झालें तरी त्यांनीं मला शिकवावें म्हणून त्यांचें प्रेम मला संपादन केलेंच पाहिजे. जवळ जाऊन विचारूं का त्यांना—पण धीर कुठें होतो आहे ? ( द्रोणाकडे पाहत सकंप )—पण कांहींहि करून धीर केलाच पाहिजे. पण कसा ? ते इतके थोर--इतके उदार दिसतात ! ( हळूहळू त्याच्या मुद्रेवर निश्चयाची छटा दिसूं लागते. ) छेः !...हें धाडस केलेंच पाहिजे मला. माझ्या गरीब बिचाऱ्या पाडसांचे जीव वांचविण्यासाठीं, कांहींहि झालें तरी हें धाडस मला करायलाच हवें. ( त्याच्या डोळ्यांत निराळीच चमक दिसूं लागते ) बस्, ठरलें ! जगांतला सर्वश्रेष्ठ धनुर्धर मला कां व्हावेसें वाटतें, तें सांगूनच टाकावें त्यांना. किती दयाळू दिसते त्यांची दृष्टि ! त्या बिचाऱ्या दीन, असहाय, निष्पाप प्राण्यांबद्दल खास प्रेम वाटत असलें पाहिजे त्यांनाहि. कोणाला वाटणार नाहीं त्यांच्याबद्दल प्रेम ? त्या कुमार पार्थाचा धनुर्विद्या शिकण्यांतला उद्देश काय असेल तो असो, पण माझ्या उद्देशाहून तो निःसंशय अधिक उदात्त असूं शकत नाहीं. ( कांहींसा दबकतच तो द्रोणांसमोर येतो. द्रोण त्याच्याकडे वळल्यावर, त्यांना साष्टांग नमस्कार घालतो. )

**द्रोण :** ( वांकून त्याला वर उचलीत ) ईश्वर तुझें कल्याण करो, वत्सा ! काय काम आहे तुझें ?

**एक० :** ( धीर येऊन उत्साहानें ) एक लहानसें मागणें मागायचें आहे आपल्याकडे, महाराज. आपण महाभाग द्रोणाचार्यच ना ?

**द्रोण :** होय. द्रोणाचार्यच मी. पण ' महाभाग ' कशासाठीं ? ( मोकळेपणानें स्मित करतो. )

**एक० :** तें नाहीं माहीत मला, महाराज. पण माझी आई आपल्याला ' महाभाग ' म्हणाली—

**द्रोण :** तुझी आई ? हं ! पण तुझ्या त्या लहानशा मागणीचें काय म्हणत होतास ?

**एक० :** कृपा करून आपण मला सर्व जगांतला सर्वश्रेष्ठ धनुर्धर व्हायला मदत कराल का, आचार्य ?

**द्रोण :** ( त्या प्रश्नानें दचकतो. पण त्यांत उघड उघड दिसून येणाऱ्या भोळ्या भावाच्या कौतुकानें ) अं ? पार्थाचा प्रतिस्पर्धी अं ! ( मोठ्यानें हंसतो ) जगांतला सर्वश्रेष्ठ धनुर्धर होण्याची आकांक्षा बाळगण्याची तुम्हां कुमारांत सध्यां लाटच आलेली दिसते मला ! ( मोठ्यानें हंसतो. )

**एक० :** ( अत्यंत गंभीर मुद्रेनें आणि थरथरत्या ओठांनीं ) आपण कां हंसतां, महाराज ? कळेल का मला ?

**द्रोण :** होय ! सांगतों, वत्सा. इतक्या सहज आणि सरळपणें आतां माझ्यापाशीं जें तूं मागतो आहेस तें आणि प्रथम लहानसें मागणें म्हणून म्हणालास तें, हीं दोन्ही निःसंशय एक असूं शकत नाहींत. या विसंगतीचें हंसूं आलें मला. मला नाहीं वाटत तूं हें मनापासून, गंभीरपणें बोलत असशील—

**एक० :** पण महाराज, मी हें अगदीं मना-पासून बोलतों आहें ! अगदीं गंभीरपणें–

**द्रोण :** ( क्षणभर एकलव्याच्या मुद्रेचें सूक्ष्म निरीक्षण करून ) हं ! पटलें मला–पण कोण तूं ? नांव काय तुझें ? तुझा पिता काय करतो ? तुझी जात कोणती ?

**एक० :** ( अभिमानानें पवित्र्यांत उभा राहून ) माझें नांव एकलव्य. निषादांचा राजा–महाराजा–सम्राट् हिरण्यधनु हा माझा पिता.

**द्रोण :** ( हलक्या आवाजांत ) निषादांचा राजा !...म्हणजे तूं निषादकुमार आहेस तर ! मग तुला धनुर्विद्या शिकण्याची उत्कंठा असावी यांत कांहींच नवल नाहीं. ( क्रीडांगणाच्या मध्य आणि पार्श्व भागाकडे सहज दृष्टिक्षेप करून ) पण वत्सा, ( मान हलवून ) मला नाहीं वाटत—

**एक० :** ( त्याला मध्येंच आडवीत करुण

स्वरानें ) क्षमा करा महाराज, आलें माझ्या ध्यानांत आपल्याला कशाचें भय वाटतें तें! आपल्याला वाटतें कीं मी निषाद आहें, तेव्हां आपण शिकविलेल्या धनुर्विद्येचा उपयोग मी गोरगरीबांची लूटमार करायला, निष्पाप प्राण्यांची हत्या करायला करीन म्हणून! पण माझ्यावर विश्वास ठेवा. माझ्या पित्याच्या मृत्यूपासून माझी आई आणि मी एका अगदीं दूरच्या वनप्रांतांत वसति करुन असतों आणि तो भाग पक्षी, हरणें, पाडसें यांनीं समृद्ध असतांहि केवळ धान्य, दूध आणि कंदमुळें यांवरच आम्ही गुजराण करीत असतों.

**द्रोण** : नाहीं, वत्सा, त्याचा नव्हतों विचार करीत मी आतां! ( एकलव्याची करुणमुद्रा पाहून त्याच्याजवळ जातो; त्याचें मस्तक कुरवाळून ) गरीब बिचारें पोर! इतक्या लहानपणीं तुझा बाप निवर्तला आणि तूं एकटाच आपल्या आईबरोबर अरण्यांत असतोस! पण मग तुला जगांतला सर्व-श्रेष्ठ धनुर्धर व्हायची इतकी तळमळ कां लागली आहे? तुझा बाप मारला गेला म्हणालास, नाहीं तूं! त्याच्या मृत्यूचा सूड घेण्यासाठीं सामर्थ्य प्राप्त व्हावें, म्हणून ही धनुर्विद्या तुला साध्य करुन घ्यायची असेल; होय ना?

**एक०** : नाहीं, महाराज, अगदीं नाहीं. माझे वडील आपल्या राजाकरितां लढत असतांना धर्म-युद्धांत मारले गेले. प्रत्येकजण सांगतो कीं त्यांना खऱ्या वीराचें मरण आलें. पण महाराज, मला जगांतला सर्वश्रेष्ठ धनुर्धर व्हायचें आहे. कारण... कारण ( विनवणीच्या आर्त नजरेनें द्रोणांच्या दृष्टीला दृष्टि भिडवून ) ती फारच लांबच लांब आणि करुण कहाणी आहे, महाराज! आणि आपण माझ्याशीं इतक्या ममतेनें बोलतां आहां कीं, ती सारी, सारी आपल्याला सांगून टाकावी असें वाटतें मला. महाराज, आपण जर-जर आपण मला आपल्या वेळांतला थोडा–अगदीं थोडासाच –वेळ द्याल, तर–माझ्या दृष्टीनें फार फार महत्त्वाची गोष्ट आहे ती—

**द्रोण** : ( एकलव्याच्या तळमळीचा मनावर परिणाम होऊन ) होय? तर मग अवश्य ऐकव मला. पण थांब जरा हं. प्रथम मी पाहून घेतों. ( चारी बाजूंना पाहातो. क्रीडांगण आतां पूर्णपणें मोकळें झालेलें आहे. ) हं ठीक! माझें सकाळचें काम आतां आटोपलें आहे. आणि या-पुढचा कांहीं वेळ माझ्या विश्रांतीचाच वेळ आहे. तेव्हां तो सर्वस्वीं तुझाच आहे, असें समज. पण आधीं आपण कुठें तरी सावलीची जागा पाहूं या बसायला. ( एकलव्याला एका वृक्षाखालीं घेऊन जातो. ) बैस, बाळ ( एकलव्य गुडघे टेकून बसतो ) हं. हें छान झालें! सांग आतां ती तुझी लांबच लांब करुण कहाणी काय आहे ती!

**एक०** : ( उत्सुक आणि गडबडलेला ) त्याचें असें झालें, महाराज-( हळूच ) खरेंच, कुठपर्यंत आलों होतों बरें मी? ( मोठ्यानें )–हो, आतां मीं आपल्याला म्हटलें कीं, आई आणि मी, आम्ही दोघेजण इथून फार फार लांब असलेल्या एका लहानशा वनांत राहातों. तेथून इथें पायीं चालत यायचें तर तब्बल तीन दिवस आणि तीन रात्री लागतात. आमच्या अरण्याशेजारीं दुसरें एक छोटेसें वन आहे. त्यांत एका ऋषीचा आश्रम आहे. आमच्या त्या अरण्यांत शेंकडों हिंस्र लांडगे आहेत. ते तेथलीं हरणें आणि पाडसें यांची क्रूर-पणें हिंसा करतात. कधीं कधीं त्यांना घायाळ करतात आणि मग भागूबाईसारखे त्या ऋषींच्या वनांत आश्रयासाठीं पळून जातात. आपणाला खरें नाहीं वाटायचें, महाराज, पण तेथल्या हरिणां-पाडसांना ते इजा करीत नाहींत–त्यांना ठार मारीत नाहींत; इतकेंच नव्हे, तर तेथल्या पाडसांशीं ते खेळतात, वागडतात, त्यांना पाजतात सुद्धां! त्या लांडग्यांचा आमच्या अरण्यांतील हरणें आणि पाडसें यांच्याबद्दलचा दुष्टावा आणि त्या ऋषींच्या आश्रमांतील पाडसांबद्दलची माया याबद्दल मी आपल्या आईला सांगितलें, तेव्हां ती म्हणाली, " कसली आली आहे त्या दुष्ट प्राण्यांना दया आणि माया; ते मूळचेच दुष्ट आणि निर्दय आणि कायमचे तसेच राहायचे. पण जोंपर्यंत ते त्या आश्रमाच्या परिसरांत असतील तोंपर्यंत त्या ऋषींच्या तपोबलामुळें त्यांच्या दुष्ट स्वभावाला आळा बसतो, इतकेंच. आणि मग मीं तिला,



अनुक्रमणिका






" आपण त्या ऋषीला आपल्या अरण्यांतील हरिणांना आणि पाडसांना त्या लांडग्यांच्या त्रासांतून मुक्त करण्याबद्दल विनंति करूं या " असें म्हटलें; तेव्हां ती म्हणाली, " त्यांच्या आश्रमाबाहेर त्यांचें तपोबल प्रभावी ठरणार नाहीं. " मग मीं तिला पुन्हां विचारलें-( एकदम आवाज खालीं उतरून ) पण आपल्याला कंटाळा तर नाहीं ना आला, महाराज ?

**द्रोण** : ( दचकतो. एकलव्याच्या मस्तकावर हलकेंच चापट मारून ) नाहीं...नाहीं, मुळींच नाहीं. चालूं दे. लक्ष आहे माझें तुझ्या बोलण्याकडे, चालूं दे.

**एक०** : आज्ञा, महाराज. फार फार उपकार आहेत आपले माझ्यावर. अं ! हो ! पण कुठवर आलों होतों मी ? हो, खरेंच, मग मीं आईला म्हटलें, " तें तपोबल मला मिळवावयाचें आहे सांग कसें मिळवायचें तें. " तेव्हां ती म्हणाली, " तुला नाहीं तें मिळवतां यायचें या जन्मीं;-कारण तूं जन्मानें निषाद आहेस. पण जर तूं या जन्मीं आपल्या जातिधर्मानुसार वागलास, तर पुढें केव्हां तरी तुला आर्यकुलांत जन्म मिळेल आणि मग तुला त्या ऋषीसारखें तप करतां येईल." तेव्हां मी तिला म्हणालों, " पुढें कधीं तरी मला आर्यकुलांत जन्म येईल तोंपर्यंत आपलीं हीं हरिणें आणि त्यांचीं पाडसें अशींच लांडग्यांच्या तोंडीं पडत राहायचीं कीं काय ? " त्यावर ती म्हणाली, " नाहीं, आपल्या धर्मानुसार तुला त्या लांडग्यांना ठार मारून त्या हरिणांचें आणि त्यांच्या पाडसांचें रक्षण करतां येईल; आणि तसें करण्यांत तुला पुण्यच लागेल. " रक्षायोग म्हणाली त्याला ती. बलाढ्य आणि क्रूर अशांपासून असहाय आणि दुर्बलांचें पीडा आणि मरण यांच्या भयांपासून रक्षण करण्याचें पुण्य, असा अर्थ सांगितला तिनें त्याचा. आणि मग, महाराज, झटकन् माझ्या मनांत एक विचित्र कल्पना आली.—मी म्हणालों कीं, " जर याच जन्मीं साऱ्या अरण्यांतले सारे लांडगे ठार मारून टाकले, तर जगांतलीं सारीं हरिणें, त्यांचीं पाडसें आणि इतर सारे निरुपद्रवी प्राणी पीडा आणि मृत्यु यांच्या भीतीपासून मुक्त होतील. आणि शिवाय निषाद असूनसुद्धां, मी याच जन्मांत केवळ आपल्याच वनविभागांतील दुर्बलांचें संरक्षण करूं शकणाऱ्या कोणत्याहि आर्यापेक्षां अधिक श्रेष्ठ ठरेन." तेव्हां ती म्हणाली, " होय. तसें ठरेल खरें; पण साऱ्या जगांतल्या साऱ्या अरण्यांतले सारे लांडगे मारून टाकायचे, म्हणजे जगांतला सर्वश्रेष्ठ धनुर्धर व्हायला लागेल तुला; आणि तें सामर्थ्य प्राप्त करून घ्यायचें, तर त्या कामीं तुला साहाय्य करूं शकतील, असे एकच महाभाग या जगांत आहेत; आणि ते म्हणजे महात्मा द्रोणाचार्य ! मग तिनेंच मला इथें कसें पोंचायचें आणि आपली भेट कशी घ्यायची तें सांगितलें. आतां आलें महाराज, आपल्या ध्यानांत मला जगांतला सर्वश्रेष्ठ धनुर्धर कां...महाराज, कराल ना आपण मला या कामांत मदत ?

[ एकलव्य आपली हकीगत सांगत असतां, द्रोणाचार्यांच्या मुद्रेवर कुतूहल, कौतुक, कारुण्य, आश्चर्य, प्रेम आणि अखेरीस आत्यंतिक आदर यांच्या छटा निदर्शित होत असतात. एकलव्याची हकीगत संपत येतां येतां द्रोणाचार्य स्थिर दृष्टीनें कित्येक क्षण त्याच्या चेहऱ्याकडे पाहात असतात. ]

**द्रोण** : ( अगदीं हलक्या आवाजांत स्वतःशींच ) " कर्मणा परार्थः " हं ! आणि तोसुद्धां एक निषादपुत्र ! आश्चर्य ! महदाश्चर्य ! !

**एक०** : ( शेवटचे दोन चार शब्द ऐकून ) होय. आहेंच मी निषाद. पण त्यांत आश्चर्य कसलें महाराज ? ( द्रोणांकडून उत्तर न मिळून ) क्षमा करा. महाराज, आपल्या...मनांत काय आलें विचारूं का ?

**द्रोण** : हो जरूर विचार बाळ, मी तुझी जात आणि तुझी महत्त्वाकांक्षा यांचा विचार करीत होतों.

**एक०** : ( निराशेनें डोळ्यांत अश्रू आणून ) नका, महाराज, माझा नका विचार करूं. कारण आपण केवळ माझ्या हीन कुलाचा, माझी जात आणि जन्म यांच्या अपेक्षेनें माझी महत्त्वाकांक्षा फारच धाडसाची आहे, याच गोष्टीचा विचार केलांत, तर कदाचित् मला धनुर्विद्या शिकवायचें पत्करूं नये असें आपल्याला वाटेल; पण माझ्याऐवजीं आपण त्या गरीब बिचाऱ्या पाडसांचा










विचार करा. अहोरात्र लांडग्यांच्या भयानें थरथरणाऱ्या त्या निरागस मुक्या जीवांचा विचार करा. लांडग्यांच्या भीतीमुळें बाहेर पडण्याचें धाडस होत नाहीं, म्हणून दिवसच्या दिवस चारा न मिळून त्यांना उपाशी राहावें लागतें. आसपास लांडगे दबा धरून बसले असतील, या भीतीनें तहानेनें घसे कोरडे पडले, तरी नदीनाल्यांच्या कांठीं पाणी प्यायला जायचें साहसहि त्यांना होत नाहीं; रात्रीं काळोखाचा फायदा घेऊन लांडगे त्यांच्या कळपांवर हल्ले चढवितात आणि त्यांचीं कच्चीं-बच्चीं पळवून नेतात. गरीब बिचाऱ्या त्या पाडसांच्या मरणकाळच्या करुण किंकाळ्या आणि त्यांच्या मातांचे ते दीन, असहाय, आर्त आक्रोश ऐकून, आई आणि मी, रात्ररात्र बेचैन तळमळत असतों. क्षणभर देखील आम्ही झोंपूं शकत नाहीं. ( दुःखभरानें हताश होऊन कांहीं क्षण दुसरीकडे पहात स्तब्ध उभा राहतो. थोड्या वेळानें धैर्यानें डोळ्यांतील अश्रु आवरून पुढें बोलूं लागतो. ) बाबा असतांची गोष्ट वेगळी होती. ते लांडग्यांना ठार करीत. त्यामुळें ते असे जवळ यायला धजत नसत. पण मला धनुष्य कसें धरायचें हें शिकविण्याची वेळ येण्यापूर्वीच ते मारले गेले. मी स्वतःच्या बुद्धीनें शिकण्याचा प्रयत्न केला. खूपखूप प्रयत्न केला. पण तें सारें स्वतःच्या एकट्याच्या प्रयत्नानें साध्य होणें शक्य दिसत नाहीं महाराज, आपण जर त्या गरीब बिचाऱ्या निष्पाप चिमुकल्या पाडसांचा आणि त्या असहाय हरिणांचा विचार कराल, तर माझी खात्री आहे, महाराज, आपण मला शिकवायचें, असेंच निखालस ठरवाल. शिवाय आणखी एक सांगायचें राहिलें आपल्याला. मीं जेव्हां आईला म्हटलें कीं, " द्रोणाचार्यांना एवढे मोठे संपन्न राजपुत्र शिष्य म्हणून लाभले असतांना, ते मला, एका निषादाला, कदाचित् शिकवायला तयार होणार नाहींत. " तेव्हां ती म्हणाली कीं, " राजपुत्रांना शिकविण्यापेक्षां तुला शिकविण्यांतच त्यांना अधिक लाभ आहे. कारण तुझ्या साऱ्या आयुष्यांत तूं जो कांहीं पुण्यसंचय करशील त्यांतला मोठा वांटा, तुझे गुरु म्हणून, त्यांच्याकडेच जाईल; आणि ते ब्राह्मण असल्यामुळें, त्यांच्या राजपुत्र शिष्यांकडून मिळणाऱ्या रत्न आणि द्रव्यरूप गुरुदक्षिणेपेक्षां, तुझ्याकडून मिळणाऱ्या या पुण्यरूप दक्षिणेचेंच त्यांना अधिक महत्त्व वाटेल... " मग महाराज, आपण मला--

[ द्रोणांच्या मुद्रेवरची विचारमग्नता पाहून एकलव्य आपला प्रश्न पुरा न करतांच स्तब्ध होतो. हें चाललें असतांना अर्जुन परत येऊन त्यानें आपल्या अभ्यासाला फिरून सुरुवात केलेली असते. त्यानें या दोघांना किंवा त्यांनीं त्याला पाहिलेलें नसतें. ]

**द्रोण** : ( दीर्घ निःश्वास टाकून अत्यंत विषण्ण स्वरांत ) मला फार वाईट वाटतें, बाळ; पण आतांच माझ्या हाताखालीं शंभराहून अधिक शिष्य आहेत, त्यांचें अध्यापन मीं पत्करलें आहे. माझें इथलें हें काम पुरें झालें म्हणजे —

**एक०** : ( क्रीडांगणाच्या मध्य आणि पार्श्व भागांवरून त्याची नजर फिरत असतांना तो निराशेच्या स्वरांत मध्येंच मोठ्यानें बोलून द्रोणांना आडवतो ). पुरें झालें म्हणजे ? पण महाराज, आपल्याकडून तें कधींच पुरें व्हावयाचें नाहीं. पहा ! पहा ! पार्थ नांवाचा तो कुमार पाहा. ( अर्जुनाकडे बोट दाखवून ) जमिनीपासून वर उचलण्याऐवजीं त्यानें आपल्या टांचा शरसंधान करतांना अजून तशाच जमिनीवर टेकल्या आहेत.

**द्रोण** : ( दचकून अर्जुनाकडे पाहातो. अर्जुनाच्या चुकीच्या पवित्र्याचें दृश्य पाहून संत्रस्त स्वरांत ) होय. खरें आहे तुझें म्हणणें; पण टांचा जमिनीवरून उचललेल्या असल्याच पाहिजेत, असें कां वाटतें तुला ?

**एक०** : अर्थात्, शरीराचा भार, ( हालचाल करून दाखवीत ) हा असा—एका पावलावरून दुसऱ्या पावलावर आणि दुसऱ्यावरून पुन्हां पहिल्यावर सहजपणें विनायास मागें-पुढें नेता-आणतां यावा म्हणून.

**द्रोण** : ( त्याच्या हालचालींतलें सौष्ठव पाहून ) धनुर्विद्येची पूर्वतयारी तूं चांगलीच केलेली दिसतेस, बाळ. तूं मघां म्हणालास तसा कांहीं अगदींच नवखा दिसत नाहींस तूं ! तुझा बाप हें तुला शिकविण्यापूर्वीच मारला गेला म्हणतोस,

मग काय हें सारें स्वतःच्या परिश्रमानें तूं शिकलास ?

एक० : नाहीं, महाराज ! मुळींच नाहीं. आतां येथें येईपर्यंत मला यांतलें कांहींच अवगत नव्हतें. आपण त्या कुमाराला–पार्थाला–शिकवीत असतांनाच मी इथं येऊन पोंचलों. आपलें बोलणें मीं ऐकलें. तें ऐकत असतां मला न कळतच या साऱ्या हालचाली माझ्याकडून व्हायला लागल्या. ( काळजीनें ) माझ्या हातून कांहीं अपराध तर नाहीं ना घडला, महाराज ?

द्रोण : ( हळू आवाजांत ) आश्चर्य आहे ! ( मोठ्यानें ) अपराध ? छे ! छे ! ! मुळींच नाहीं.

**एक० :** ( अर्जुनाकडे अंगुलिनिर्देश करून ) तो पाहा, महाराज, तो पुरेसा मागें झुकत नाहीं– आणि शिवाय–हं ऽ ! आपलें इथलें काम कधींच संपावयाचें नाहीं, महाराज ! कारण त्या कुमार पार्थांत कधींहि सुधारणा होईल कीं नाहीं, कोण जाणें !

**अर्जुन :** ( एकलव्याचे ऐकूं आलेले शब्द पुन्हां उच्चारीत ) " कुमार पार्थांत कधींहि सुधारणा होईल कीं नाहीं ? " कोण बोललें हें !

एक० : कां ? मी बोललों.

**अर्जुन :** ( एकलव्याजवळ जाऊन ) कसें कळलें तुला माझ्यांत कधींच सुधारणा व्हायची नाहीं म्हणून ?

एक० : अं: ! अगदीं उघड आहे तें. तुझ्या गुरुजींनीं तुला सांगितलें कीं, धनुर्विद्येंत प्रावीण्य मिळवायला, एकाग्रता अत्यंत आवश्यक आहे; आणि तुझी तर मुळींच एकाग्रता झाली नव्हती.

**अर्जुन :** कशावरून म्हणतोस माझी एकाग्रता झाली नव्हती म्हणून ?

एक० : त्यांत काय कठीण आहे ? गुरुजी म्हणाले कीं, धनुर्धराची खरीखुरी एकाग्रता झाली असली, तर बाणाच्या सणत्काराव्यतिरिक्त त्याला दुसरें कांहींच ऐकूं येत नाहीं.–तुझी खरोखरच एकाग्रता झालेली असती, तर माझें बोलणें तुला ऐकूंच आलें नसतें. ( अर्जुन ओशाळतो ) शिवाय गुरुजींनीं धनुर्विद्येच्या पूर्वतयारीबद्दल जें सांगितलें त्याचा तर तुला अगदींच विसर पडलेला दिसतो. तुझ्या टांचा जमिनीपासून वर उचललेल्या असायला हव्या होत्या, तेव्हां तूं त्या जमिनीवर टेकल्या होत्यास आणि जेव्हां तूं मागें झुकला होतास तेव्हां तुझ्या शरीराचा भार पुढच्या पायावर होता. त्याप्रमाणेंच—

अर्जुन : बस् ! बस् झालें ! ! तोंड आटप एकदम. कोण आहे हा, गुरुजी ? काय काम आहे याचें इथें ?

द्रोण : ( रूक्ष स्वरांत ) त्यालाच विचार कीं. ( किंचित् मागें सरून तोंड फिरवतो. )

**अर्जुन :** ( उद्धटपणें ) कोण तूं ? काय काम आहे तुझें इथें ?

**एक० :** मी एक निषाद आहें आणि मला जगांतला सर्वश्रेष्ठ धनुर्धर व्हायचें आहे. त्या कामांत मला मदत करा, अशी तुझ्या गुरुजींना विनंति करायला मी इथें आलों आहें—

**अर्जुन :** ( खदाखदा हंसत तिरस्काराच्या स्वरांत ) जगांतला सर्वश्रेष्ठ धनुर्धर व्हायचें आहे ? वाः वा ! अरे, जें एकाद्या आर्यालासुद्धां अशक्य-प्राय तें तुझ्यासारख्या यःकश्चित् निषादाला साध्य होईल, असें तुला क्षणभर तरी कसें वाटलें ?

एक० : ( अर्जुनाच्या हास्यानें मुळींच विचलित न होतां ) कां ? काय झालें मी निषाद असलों म्हणून ? तूं आर्य आहेस, याचा शरसंधान करीत असतांना तुला काय फायदा मिळतो ? तूं ही आपली विनाकारण हंसण्याची संवय क्षणभर विसरलास, आणि गुरुजींनीं जें कांहीं शिकविलें त्याचें नीट स्मरण ठेवलेंस, तर तुला आठवेल कीं, कोणत्याहि जातीच्या माणसाला सर्व जगांतला श्रेष्ठतम धनुर्धर व्हायला केवळ पांचच गोष्टींची आवश्यकता आहे. ( सांगतां सांगतां बोटें मोडून त्यांवर मोजीत ) प्राथमिक भूमिकेची प्रभुता, एकाग्रता करण्याची शक्ति, गुरुबद्दलचें गाढ आणि उत्कट प्रेम, गुरूची शिष्याला शिकवायची मनापासूनची इच्छा, आणि शेवटीं परिश्रमपूर्वक साधना. माझी प्राथमिक तयारी परिपूर्ण झाली आहे; मला चित्त एकाग्र करतां येतें; माझें यांच्यावर गाढ प्रेम आणि उत्कट भक्ति आहे; अहोरात्र परिश्रम करून विद्यासाधन करायची माझी तयारी आहे. मला









अनुक्रमणिका

कशाची उणीव असेल तर, ती मला मनापासून शिकविण्याची यांची तयारी असण्याची. ती मीं मिळविली कीं, मी जगांतला सर्वश्रेष्ठ धनुर्धर सहज होऊं शकेन, अशी खात्री आहे माझी. धनुर्विद्या साध्य करायला आर्यांना निषादापेक्षां अधिक कांहीं सवलती उपजतच लाभलेल्या असतात, असें ते म्हणाल्याचें निदान मला तरी आठवत नाहीं. आर्य असणें हें धनुर्विद्येच्या साधनेंतलें सहावें आवश्यक तत्त्व आहे, अशी स्वतःची समजूत करून घेणें, हें आपल्या स्वतःच्या जातीबद्दलच्या तुझ्या मूर्खपणाच्या अभिमानाचें आणि माझ्या जातीबद्दलच्या तुझ्या क्षुद्र तिरस्काराचें लक्षण होय.

**अर्जुन** : ( मर्मभेद झाल्याप्रमाणें ) माझ्या जातीबद्दलच्या माझ्या मूर्खपणाच्या अभिमानाचें लक्षण अं ? काय अर्थ तुझ्या बोलण्याचा ?

**एक०** : ( स्मित करीत ) अर्थ काय ? अर्थात् माझ्या शब्दांतून उघड उघड निघतो तोच ! तुझ्या जातीबद्दलच्या तुझ्या अभिमानाला मीं मूर्खपणा म्हटलें, याचा अर्थ हाच कीं, तुला तुझ्या जातीबद्दल अभिमान वाटतो, पण तसा अभिमान बाळगायला आपल्या जातींत विशेष काय आहे, याची मात्र तुला मुळींच जाणीव नाहीं.

**अर्जुन** : मला जाणीव नाहीं, अं ? (उपहासानें) अन् तुला कसें कळलें तें ?

**एक०** : कसेंहि कळलें असेल; पण खरोखरच जर तुला आर्य होण्यांत विशेष काय आहे, याची जाणीव असेल, तर तूंच सांग कीं मला तो विशेष काय आहे तो ! मी निषाद आहें. तूं आर्य आहेस. तरीहि मी तुझ्याइतकाच सशक्त आहें, आणि तुझ्या गुरुंची कृपा आणि इच्छा असेल, तर तुझ्याइतकाच प्रभावी धनुर्धर मलाहि होतां येण्यासारखें आहे. या तुझ्या नगरांत तुला कांहीं हवें असेल तें जसें तुला मिळवितां येतें, तसेंच माझ्या त्या सुंदर अरण्यांत तें मलाहि प्राप्त करून घेतां येतें. मग आर्यकुलांत जन्माला आल्यामुळें असें कोणतें श्रेष्ठत्व तुला आपोआप मिळालें आहे, तें कळूं दे तर मला !

**अर्जुन** : ( क्षणमात्र गोंधळून जातो आणि विचार करूनहि कांहीं सुसंबद्ध आणि बिनतोड उत्तर न सुचल्यामुळें अखेरीस ' शेषं कोपेन पूरयेत् ' या न्यायानें चिडक्या मर्मभेदक स्वरांत ) तूं म्हणतोस तसा तूं असशील; आणि गुरुजींनीं शिष्य म्हणून पत्करायचें कबूल केलें, तर माझ्या तोडीचा धनुर्धर तूं होशीलहि कदाचित्. पण कांहीं झालें—कांहीं केलें, अन् कांहींहि म्हटलें, तरी आर्य तो आर्य आणि अधमकुलोत्पन्न निषाद तो निषादच—

**एक०** : ( खदखदां हंसत ) खरोखर तुझें हें बोलणें ऐकून मला हंसूंच येतें.

**अर्जुन** : ( तीव्र स्वरांत ) असें हंसण्यासारखें काय आहे त्यांत ?

**एक०** : हंसूं नको तर काय करूं ? कारण, आपण आर्य आहों याचा अभिमान कां बाळगायचा, तर आपण निषाद नाहीं म्हणून; एवढीच तुझी याबद्दलची कल्पना दिसते मला ! म्हणजे जगांत जर निषाद अस्तित्वांतच नसतील, तर तुम्हां बिचाऱ्या आर्यांना, आपण आर्य असल्याबद्दलचा अभिमान बाळगायला कांहींच शिल्लक उरणार नाहीं म्हणायचें !

**अर्जुन** : असें खरेंच वाटतें तुला, होय ?

**एक०** : मुळींच नाहीं. आर्य असण्याचा अभिमान वाटावा असें काय आहे, याची मला पूर्ण जाणीव आहे. तुला मात्र त्याची कल्पनाहि नाहीं. तुला तें ऐकायचें असेल, समजून घ्यायचें असेल, तर सांगतों हवें तर.--ज्या अरण्यांत मी राहातों त्यांत हिंस्र लांडगे बिचाऱ्या निरुपद्रवी हरिणांचा, त्यांच्या पाडसांचा फन्ना उडवीत असतात. आणि त्या हरिणांचे आणि पाडसांचे जीव वांचवायचे तर त्या लांडग्यांचा जीव घेण्यावांचून मला दुसरा कांहींच मार्ग नाहीं. पण माझ्या अरण्याशेजारच्या वनांत एक आर्य ऋषि राहतात. त्यांना आपल्या हरिणांचें आणि पाडसांचें रक्षण करण्यासाठीं लांडग्यांना ठार मारावें लागत नाहीं. तें कार्य आपल्या तपोबलानें ते साध्य करतात. माझ्या पद्धतीनें हरिणांचें आणि त्यांच्या पाडसांचें रक्षण करायचें म्हणजे लांडग्यांना मृत्युमुखांत लोटावें लागतें, इतकेंच नव्हे, तर त्यांचीं बिचारीं कच्चींबच्चीं, ज्यांनीं अजून कोणाचें कांहींच वांकडें केलें नसेल, तीं आपल्या आईबापांना पारखीं होतात—पोरकीं होतात ! पितृवियोगाचें दुःख आणि








आईची माया यांचा मला पूर्ण अनुभव असल्या-मुळें, त्या बिचाऱ्या लांडग्यांच्या पिल्लांचीं मला अतिशय कींव येते. तेव्हां तूंच पहा कीं, जें आर्यांला करतां येतें तेंच निषादाला करतां येतें, पण आर्य तें कोणालाहि पीडा किंवा त्रास न देतां करूं शकतो, हाच त्यांतला अभिमान वाटावा असा विशेष होय. केवळ आपण तींत जन्माला आलों, म्हणून तुला जो आपल्या जातीचा वृथा अभिमान वाटतो, तो तुझें डोकें पोकळ असल्याचें लक्षण आहे.

अर्जुन : ( संताप आवरीत ) माझें डोकें पोकळ ?

एक० : ( सस्मित ) नाहीं तर काय ? आई नेहमीं म्हणते कीं, दुसऱ्याचें भलें करण्याच्या आपल्या शक्तीपेक्षां स्वतःच्या जातीबद्दलचा अधिक अभिमान धरणें, हें निर्बुद्धपणाचें लक्षण आहे. शिवाय "अधमकुलोत्पन्न निषाद तो निषादच" असें आतां तूं ज्या थाटांत म्हणालास ना, त्यावरुन तर हें अगदीं उघडच झालें कीं, तुझें डोकें अगदीं पोकळ आहे; एवढेंच नव्हे तर तुझें मनहि दुबळें आहे; कारण आई नेहमीं सांगते कीं, दुसऱ्याच्या जातीबद्दल तुच्छता दाखविणें, हें भ्याडपणाचें लक्षण आहे !

**अर्जुन** : ( विफल संतापानें जळफळत ) माझें डोकें पोकळ ? मी दुबळ्या मनाचा ? भ्याड ? नाहीं. माझें डोकें पोकळ नाहीं; मी दुबळ्या मनाचा नाहीं-मी भ्याड नाहीं.

**एक०** : ( हुकमी स्वरांत ) जरूर आहेस. यांतली प्रत्येक गोष्ट तुला लागूं आहे. तूं खरो-खरच दुबळ्या अंतःकरणाचा नसतास, तर तुला माझी भीति कां वाटती ?

**अर्जुन** : तुझी भीति ? मला ? हंः ! मुळींच भीति वाटत नाहीं तुझी मला.

**एक०** : नाहीं वाटत ? तर मग काय तुला मी आवडतों ?

**अर्जुन** : ( घृणायुक्त मुद्रा आणि स्वरानें ) तूं मला आवडतोस ? नाहीं. मुळींच नाहीं. तुझ्याबद्दल मला घृणा वाटते-तिरस्कार वाटतो.

**एक०** : ( विजयानंदानें हंसून ) हाः हाः ! वाटलेंच मला. माझ्याबद्दलची ही तुझी घृणाच सांगते कीं, तूं मला घाबरतोस. आई नेहमीं म्हणते, "अप्रीति हें भीतीचेंच दुसरें नांव आहे." ( मुद्रा आणि स्वर यांत मार्दव आणून ) पण मला तूं मुळींच अप्रिय नाहींस. किंबहुना मला तूं आवडतोस— आणि म्हणूनच मला तुझ्याबद्दल वाईट वाटतें.

अर्जुन : तुला ? माझ्याबद्दल वाईट वाटतें ? तें कां म्हणून —

एक० : वाईट वाटतें तें एवढ्यासाठीं कीं, महाभाग द्रोणाचार्यांसारखे गुरु तुला इतके महिने लाभले असतांहि तूं होतास तसाच कोरडा राहिलास—

**अर्जुन** : ( खेंकसून ) असूं दे मी असेन तसा ! मी कसा आहें याच्याशीं तुला काय करायचें आहे ? ( द्रोणांकडे वळून, चिडून एकलव्याकडे हात फलकारीत ) हें सारें आहे काय, गुरुजी ?

द्रोण : ( रूक्ष स्वरांत ) काय 'काय' आहे, पार्था ?

अर्जुन : ( स्वतःवरील ताबा सुटल्यामुळें तुटक-तुटकपणें ) या जंगली माणसाची ही सारी बडबड ! ( आवाज चढवून पिशाच्चसंचार झाल्याप्रमाणें ) कोण आहे हा, गुरुजी ? काय काम आहे याचें इथें ?

एक० : त्यांना कशाला विचारतोस ? मी कोण आणि माझें काम काय, हें मी तुला आधींच सांगितलें आहे.

**अर्जुन** : हो ! पण त्यांना सांगितलेंस का तें ?

**एक०** : हो; अर्थात् सांगितलें आणि आपला शिष्य म्हणून माझा स्वीकार करा अशी विनंती-सुद्धां केली.

**अर्जुन** : ( एकलव्याकडे तिरस्कारानें पाहतो. ) गुरुजी तुला-एका निषादाला—आम्हां राजपुत्रां-च्या बरोबरीनें शिष्य म्हणून पत्करणार ? हंः ! असें वाटायला खरोखरच वेड लागलें असलें पाहिजे तुला. मूर्ख, उद्धट पोरा, आमचे गुरुजी किती थोर, किती उदार आहेत, याची तुला कल्पनाहि दिसत नाहीं. अपरंपार द्रव्य आणि अनर्घ्य रत्नें, दक्षिणा म्हणून द्यायला तयार असलेल्या किती तरी संपन्न राजकुमारांना यापूर्वी त्यांनीं शिकवायचें नाकारलें. आणि आतां ते तुझ्यासारख्या



अनुक्रमणिका

चिंध्या पांघरणाऱ्या आणि कांहींहि दक्षिणा देऊं न शकणाऱ्या, एका अकिंचन निषादाच्या पोराला शिष्य म्हणून पत्करतील, होय ? मूर्ख कुठला !

**एक०** : मूर्ख तूं आहेस; आणि आपले गुरुजी किती थोर, किती उदार आहेत, याची कल्पना कोणाला नसेल, तर ती तुलाच नाहीं. अरे, त्यांना दक्षिणाच हवी असेल, तर ती मिळविण्यासाठीं आपल्या शिष्याला शिकवून तयार करणें, त्यांना काय अवघड आहे ? ( द्रोणाला ) खरें कीं नाहीं, महाराज ? ( हंसू आवरून द्रोण कांहींच उत्तर न देतां दुसऱ्या बाजूला वळतो. एकलव्य अर्जुनाला उद्देशून पुढें बोलूं लागतो. ) मी अकिंचन असेन, पण महाभाग आचार्यांनीं शिष्य म्हणून जर माझा स्वीकार केला, तर असहाय आणि दुर्बलांचें, पीडा आणि मरणाचें भय यांपासून रक्षण करून, माझ्या साऱ्या आयुष्यांत मी जो कांहीं तपःसंचय करीन, त्यांतला फार मोठा वांटा, त्या कामासाठीं मला पात्र केल्याबद्दल, त्यांच्याचकडे जाईल आणि आचार्य ब्राह्मण आहेत, तेव्हां सुवर्ण आणि रत्नें यांपेक्षां दक्षिणा म्हणून त्यांना तपाचीच महती अधिक वाटेल, हें उघड आहे. ( द्रोणाला ) होय ना महाराज ? खरें आहे ना मी म्हणतों तें ?

**द्रोण** : पटली याची ओळख तुला, पार्था ?

**अर्जुन** : याची ओळख ? असें काय करतां, गुरुजी ? मीं पूर्वी कधीं याला पाहिलासुद्धां नाहीं !

**द्रोण** : नसशीलहि पाहिला कदाचित्–पण आतां थोड्या वेळापूर्वीच त्याच्याबद्दल आपण दोघे बोलत होतों––नाहीं आलें तुझ्या ध्यानांत, पार्था ? ज्याला उत्तम अर्थानें ' कार्मी ' म्हणतां येईल तोच हा ! पृथ्वीवरील सर्व अरण्यांतील सर्व हिंस्र श्वापदें ठार करायचीं, आणि सर्व हरणें, त्यांचीं पाडसें आणि इतर निरुपद्रवी प्राणी, यांना भय आणि पिडा यांपासून मुक्त होऊन सुखानें जगतां यावें, अशी परिस्थिति निर्माण करावयाची, हें याचें ध्येय आहे आणि त्यासाठीं आपण जगांतील सर्वश्रेष्ठ धनुर्धर व्हावें, असें या बटुमूर्तीला वाटतें आहे.

**अर्जुन** : ( चिडक्या स्वरांत ) तें सारें ठीक आहे, गुरुजी; पण आपलें अंतःकरण हीं " उदात्त ध्येयें ", " अरण्यें आणि पाडसें ", " कार्मी ", " निषाद ", " उत्तमार्थी ", " लांडगे " यांनीं भारावून गेल्यामुळें, आपण मला दिलेल्या वचनाचा आपल्याला विसर पडलेला दिसतो.

**द्रोण** : ( दचकून ) वचन ? कसलें वचन ?

**अर्जुन** : हें पाहा ! पडलाच विसर आपल्याला त्याचा ! हा उद्धट निषाद बटु आणि त्याची ती अमर्याद महत्त्वाकांक्षा, यांबद्दलच्या विचारांत गुरफटून गेल्यामुळें, मला आपण जगांतील सर्वश्रेष्ठ धनुर्धर करायचें वचन दिलें होतें, त्याचा आपल्याला अगदींच विसर पडला, गुरुजी. आपण जर त्याला शिष्य म्हणून पत्करलें तर तो–तो– ! आपल्या ध्यानांत कसें येत नाहीं, गुरुजी ?

**द्रोण** : पण पार्था, मीं तुला तसें वचन दिलें असलें, तरी आपला उच्च उद्देश सिद्धीला नेण्यासाठीं मीं त्याला मदत करायला, तें माझ्या आड येण्याचें कांहींच कारण नाहीं.

**अर्जुन** : पण त्याला साहाय्य करणें आणि मला दिलेलें स्वतःचें वचन पाळणें, या दोन्ही गोष्टी आपण एकाच वेळीं करूं शकणार नाहीं, गुरुजी. आपण त्याचे गुरु झालां तर तो माझ्या बरोबरीचा–निदान जवळजवळ माझ्या बरोबरीचा–धनुर्धर होण्याचा संभव आहे; नाहीं का ?

**एकलव्य** : ( हंसत हंसत, त्याची नक्कल करीत ) " बरोबरीचा–जवळजवळ बरोबरीचा-निदान-संभव आहे ! " मी कोणत्या दर्जाचा धनुर्धर होण्याचा संभव आहे, याचा अंदाज करण्याचे श्रम तूं घेतलेस–मोठा उपकार केलास माझ्यावर ! पण महाभाग आचार्य जर खरोखरच माझे गुरु झाले, तर मी कशा प्रकारचा धनुर्धर होईन याबद्दलच्या अंदाजांत ' जवळजवळ ', ' निदान ', ' संभव '–असल्या शब्दांना जागाच नाहीं. तसें झालें, तर जगांतला सर्वश्रेष्ठ धनुर्धर मी होईनच होईन, याबद्दल मला मुळींच शंका नाहीं.

**अर्जुन** : ( मान मुरडून ) पाहा, पाहा, गुरुजी ! ऐका हे याचे उद्दाम उद्गार ! ( थोडा वेळ कांहीं न बोलतां आंतल्या आंत जळफळत, ओठांवर उफाळून येणारे शब्द प्रयत्नपूर्वक तसेच गिळून टाकीत आत्मसंयमन करण्याचा प्रयत्न करीत असतो. थोड्या वेळानें द्रोणांना उद्देशून सूचक स्वरांत )








आतांच मला माझ्या बंधूंकडून समजलें कीं, ताताजी भीष्मांनीं थोड्या वेळापूर्वीं येथून परत जातांना प्रत्येकाला बजावून सांगितलें कीं, "आपल्या गुरुजींच्या वेळांतील प्रत्येक क्षणाचा जितका जास्तींत जास्त उपयोग करून घेतां येईल तितका करून, घ्यायला चुकूं नका." आणि तसें पाहावयाचें, तर आधींच आपणांला आम्हां सर्वांना शिकवायला पुरेसा वेळ मिळत नाहीं. आणि आतां त्यांत आपण आणखी एक नवा विद्यार्थी घेणार असलां——

एक० : ( कारुण्यपूर्ण स्वरांत अर्जुनाला ) तुमच्या गुरुजींच्या वेळांतील एक क्षणाचाहि मी अपहार करणार नाहीं. त्यांच्याच अनुज्ञेनें तुम्ही मला दररोज येथें येऊं देण्याचा चांगुलपणा दाखवाल तर, तुम्ही शिकत असतांना, नुसतें पाहाण्या-पलीकडे मी कांहींहि करणार नाहीं आणि तुमच्या गुरुजींच्या वेळांतला तुमचा एक क्षणहि हिरावून न घेतां-मला जें कांहीं शिकतां येण्यासारखें असेल तेवढेंच मी शिकेन-आणि——

अर्जुन : ( त्याला मध्येंच आडवून त्याचें वाक्य पूर्ण करीत )-धनुर्विद्येंत माझ्याहिपेक्षां अधिक पारंगत होईन, असेंच कीं नाहीं ? नाहीं. तें शक्य नाहीं.

एक० : ( डोळे पाण्यानें भरून येत असतां अश्रू आवरण्याचा प्रयत्न करीत ) मला धनुर्विद्या शिकण्याची संधि दे, अशी तुझी विनवणी करतांना माझ्या स्वतःबद्दलचा विचार माझ्या अंतःकरणांत जरासुद्धां येत नाहीं. शेंकडों निरपराध पाडसें नित्य लांडग्यांच्या भक्ष्यस्थानीं पडत असलेलीं दिसत असल्यामुळें, त्यांना वांचवतां यावें, एवढ्याच उद्देशानें मी ही प्रार्थना करतों आहें. तुलादेखील नसतील का आवडत तीं गोजिरवाणी पाडसें ? पण कदाचित् तूं नेहमीं नगरांतच राहिल्यामुळें तुला तीं पाहायला मिळालीं नसतील-पण तूं माझ्याबरोबर अरण्यांत आलास, आणि तिथें त्यांचे ते आर्त आक्रोश तुझ्या कानीं पडले, त्यांच्या कारुण्यपूर्ण, असहाय दृष्टीचें तुला दर्शन झालें, तर माझी खात्री आहे, माझ्या जीवन-कार्याला साहाय्य करायला तूं स्वतःच उत्सुक झाल्यावांचून राहणार नाहींस. तुम्ही धनुर्विद्येचा अभ्यास करीत असतांना, मी नुसता तो पाहात राहिलों, तर काय नुकसान होणार आहे तुमचें त्यांत ?

अर्जुन : नुकसान काय होणार ? व्हायला नको तेंच नुकसान होणार. आमची साधना चाललेली असतांना ती पाहून आणि गुरुजी आम्हांला शिकवीत असतांना तें ऐकून, आमच्या-पेक्षां तूंच, कां कोणास ठाऊक, जास्त शिकशील असें वाटतें मला. आतां हेंच पाहा ना ! नुसतें चोरून ऐकून, धनुर्विद्येच्या पूर्वतयारीबद्दल ज्या पद्धतीनें तूं हें सारें ज्ञान हस्तगत केलेंस, त्यावरून तुला पुन्हां येथें येऊं देणें किती धोक्याचें आहे, याचा मला चांगलाच धडा मिळाला !--( द्रोणांस ) गुरुजी, आमचें सर्वांचें शिक्षण पुरें होईतों, एकहि नवा शिष्य स्वीकारणार नाहीं, असें आपण ताताजींना वचन दिलें होतें, त्याचा आपल्याला विसर पडलेला दिसतो. तेंच कारण सांगून कित्येक राजपुत्रांना आपण यापूर्वीं परत पाठविलें आणि आतां आपण जर या निषादकुमाराला नवा विद्यार्थी म्हणून दाखल करून घेतलें, तर तें ताताजींना फारसें आवडणार नाहीं.—हो——म्हणजे——समजा कीं मीं तें त्यांच्या कानीं घातलें——नव्हे तें त्यांना तसेंच कर्णोपकर्णीं समजलें——

**द्रोण** : तर तें त्यांना रुचणार नाहीं. होय. बरोबर आहे तुझें म्हणणें, पार्था ! ( एकलव्या-जवळ जाऊन डाव्या हातानें त्याचें मस्तक कुरवाळतो व उजव्या हातानें त्याची हनुवटी धरून त्याचा चेहरा वर उचलतो-त्याच्या नजरेला नजर भिडवून अत्यंत निराशायुक्त स्वरांत ) असें पाहा, बाळ, आपल्या या देशाचा अनभिषिक्त सम्राट् असा एक थोर पुरुष आहे. मला त्याच्याबद्दल अत्यंत आदर आणि परमावधीचें प्रेम आहे. मीं त्याला वचन दिलें आहे कीं, ( चोहोंबाजूला हातानें दाखवून ) या त्याच्या नातवांचें शिक्षण माझ्याकडून पुरतें पार पडल्याशिवाय मी आणखी कोणालाहि शिष्य म्हणून पत्करणार नाहीं. तेव्हां तूंच सांग, माझें तें वचन मीं मोडावें, असें तूं मला म्हणशील का ? अगदीं खरें सांग ! म्हणशील ?

एक० : ( त्याचे डोळे पाण्यानें भरून आले



अनुक्रमणिका





असून, द्रोणांकडे करुण दृष्टीनें पाहात, घोगऱ्या, सनिःश्वास स्वरांत तुटकतुटक शब्दांनीं बोलतो ) आलें माझ्या ध्यानांत, महाराज. पुरे आलें. माझें आपल्यावर इतकें प्रेम आहे, आपल्यावर माझी इतकी भक्ति आहे कीं, ज्याच्याबद्दल आपणाला प्रेम आणि आदर वाटतो, अशा त्या दुसऱ्या थोर पुरुषाला आपण दिलेलें वचन आपल्याला मोडायला लावायला मी कधींच कारणीभूत होणार नाहीं, याबद्दल खात्री बाळगा. ( थोडा वेळ थांबून अंतःकरणाच्या यातना कह्यांत आणण्याचा प्रयत्न करीत असतो, पण त्याचा इलाज चालत नाहीं. तसाच पुढें बोलूं लागतो ) पण त्या गरीब बिचाऱ्या पाडसांवर मात्र यामुळें फार कठिण प्रसंग ओढवणार आहे; नाहीं का, महाराज ? पण त्याला कांहीं उपाय नाहीं. ( मस्तक नम्र करून उभा असतो. स्वतःशींच पण मोठ्यानें विचार केल्याप्रमाणें ) गरीब बिचारीं पाडसें ! —पण तसें म्हटलें तर खरोखर कशाची उणीव आहे मला ? ( एकेका तत्त्वाचा उच्चार करीत असतांना बोटें मोडून मोजीत ) यांनीं सांगितलें कीं, माझी पूर्वतयारी चांगली झाली आहे. मला चित्त एकाग्र करतां येतें. माझें यांच्यावर प्रेम आहे, भक्ति आहे. अहोरात्र अविश्रांत परिश्रम आणि अभ्यास करण्याची माझी तयारी आहे. आतां फक्त उणीव राहिली काय ती मला प्रेमपूर्वक मनापासून शिकविण्याची यांची तयारी असण्याची. बस्, त्यांची मला अंतःकरणपूर्वक शिकविण्याची इच्छा असणें एवढी एकच गोष्ट काय ती माझ्या बाबतींत कमी आहे. ( थोडा वेळ विचारमग्न होतो आणि मग त्याच्या डोळ्यांत एकदम चमक दिसूं लागते ) पण यांची मला मनापासून शिकविण्याची तयारी असली, तर सारा वेळ मी यांच्याजवळ असलेंच पाहिजे असें कुठें आहे ? छेः ! मुळींच नाहीं तसा अर्थ. ( त्याच्या डोळ्यांत आंसूं असतांनाच हासूं दिसूं लागतें ) बस् ! त्यांची मला शिकविण्याची इच्छा—तयारी—असली म्हणजे झालें ! पुरे मला तेवढी ! ती मिळविण्यासाठीं त्यांना विनंति करावी, म्हणजे झालें. पण हो ! तेंसुद्धां फार जपून आणि सावधपणें केलें पाहिजे. ( द्रोणाला उद्देशून काळजीच्या स्वरांत ) क्षमा करा, महाराज; जर आपणांला सवड असती —मला शिकवायला आपण मोकळे असतां, तर मी निषाद आहें, या गोष्टीचा आपल्या मार्गांत—

**द्रोण** : नाहीं, बाळ, त्या गोष्टीची मला मुळींच पर्वा वाटली नसती. सर्व जातींतील सर्व बालकांबद्दल मला सारखीच ममता वाटते.

**एक०** : तें मी जाणतों, महाराज ! आणि खरें म्हटलें, तर मीं तें आपल्याला विचारायलाच नको होतें-पण, महाराज धनुर्विद्या शिकण्याच्या माझ्या उद्देशाबद्दल आपलें मत चांगलें आहे ना ?

**द्रोण** : त्याबद्दल चांगलें मत ? इतकेंच नव्हे, बाळ, तर मला आदर वाटतो त्याच्याबद्दल.

**एक०** : ( उघडउघड धीर येऊनहि सकंप ) तर मग माझ्या या अखेरच्या लहानशा प्रश्नाला आपण उत्तर द्याल का, महाराज ? कारण माझें त्याच्यावर फार-नव्हे सर्वस्व-अवलंबून आहे—तेव्हां विचारूं का, महाराज ?

**द्रोण** : ( आश्वासनयुक्त स्मित करून ) विचार, बाळ, विचार ! तुला काय हवें तें विचार.

**एक०** ( प्रत्येक शब्द मागून पुढें सरकविल्याप्रमाणें सावकाश-विचारपूर्वक उच्चारीत, साशंक स्वरांत ) महाराज, आपल्याला फुरसत असती, आणि मला शिकवायला आपण मोकळे असतां, तर मला शिकविणें आपल्याला आवडलें असतें ? अगदीं थोडें तरी आवडलें असतें का ?

**द्रोण** : ( एकलव्याच्या खांद्यावर हात ठेवून पुढें वांकून प्रेम आणि कौतुकयुक्त स्वरांत ) आवडलें असतें ? थोडें तरी आवडलें असतें ? काय सांगूं, बाळ, मला अगदीं थोडीहि शक्यता असती, तर मीं मनापासून तुला मोठ्या प्रेमानें शिकविलें असतें.

**एक०** ( क्षणमात्र त्याची नजर चमकते. नंतर त्याच्या मुद्रेवर कांहींशा सावधपणाच्या छटा उमटतात. सचिंत स्वरांत ) आपण मला प्रेमानें शिकविलें असतें, याचा अर्थ आपली मला अगदीं अंतःकरणपूर्वक शिकविण्याची तयारी आहे, असाच होतो ना ?

**द्रोण** : ( त्याचा आशय न उमजून पण तरीहि








स्मित करीत ) म्हणजे ? अर्थात् होतो !. निश्चित तसाच होतो.

एक० : ( हर्षनिर्भर स्वरांत ) बस्स ! पुरं तेवढें मला ! गुरुजी, आतां घरीं जाऊन मी तावडतोब आपल्या साधनेला सुरुवात करणार ! नमस्कार, गुरुजी आतां मला घरीं जायची परवानगी असावी. ( द्रोणांपुढें साष्टांग नमस्कार घालतो. )

**द्रोण** : ईश्वर तुझें कल्याण करो ! ( एकलव्याला वर उठवतो, त्याची प्रफुल्लित, हर्षानिर्भर मुद्रा पाहून ) पण एकाएकीं एवढा आनंद कसला झाला आहे तुला ?

**एक०** : ( विजयानंदानें ) आनंद याबद्दल, गुरुजी, कीं, आतां–अगदीं या क्षणापासून माझीं पाडसें भयापासून मुक्त झालीं. सुरक्षित झालीं. वांचलीं. ( डाव्या बाजूच्या बाहेर जाण्याच्या वाटेकडे जातो )

**द्रोण** : ( एकलव्य जात असतां त्याच्याकडे पाहात ) जा. मी तुला प्रेमानें निरोप देतों.

**एक०** : ( क्षणमात्र मागें वळून सहर्ष मुद्रेनें आत्मविश्वासदर्शक स्वरांत ) नाहीं. आपण दोघे कधींच एकमेकांचा निरोप घेणार नाहीं, गुरुजी ! केव्हांच नाहीं.

( एकलव्य डाव्या बाजूच्या बाहेर जाण्याच्या वाटेनें निघून जातो. )

**द्रोण** : ( एकलव्य जात असतां त्यावर दृष्टि स्थिर ठेवून कपाळाला आठी पाडून विचाराक्रांत मुद्रेनें ) अं: ? काय अर्थ या मुलाच्या बोलण्याचा ?

**अर्जुन** : ( आतांपर्यंत क्रीडांगणाच्या मध्यभागीं शरसंधानाची साधना करीत असलेला ) दिला घालवून त्याला गुरुजी ?

**द्रोण** : घालवून दिला ? कोणाला ?

**अर्जुन** : ( बाण सोडून पुढें झुकत ) दुसऱ्या कोणाला, गुरुजी ? त्या उर्मट, रानटी निषादाच्या पोराला--

**द्रोण** : ( एकदम त्याच्याकडे वळून हात पसरून रागानें ) पार्था ! हीच का तुझी एकाग्रता ?

**अर्जुन** : ( धनुष्य आणि भाता जमिनीवर टाकून मस्तक खालीं घालतो ) क्षमा करा, गुरुजी, क्षमा करा. पण काय झालें आहे कोणास ठाऊक–कांहींहि केलें, तरी त्या निषादकुमाराला आपल्या मनांतून दूर करतांच येत नाहीं मला --

**द्रोण** : ( वळतो. एकलव्य अखेरीस जेथून दिसेनासा झाला त्या बिंदूवर त्याची दृष्टि खिळलेली असते. दीर्घ निःश्वास टाकतो. त्याच्या तोंडांतून एकेक शब्द अडखळत बाहेर पडतो )—आणि मलाहि नाहीं, पार्था; मलाहि नाहीं ! !

[ हळूहळू पडदा पडतो. ]



अनुक्रमणिका






# अंक दुसरा

[ **स्थळ** : अरण्यांतील एक मोकळा भाग.

**दृश्य** : द्रोणाचार्य आणि अर्जुन पुढच्या भागांतील उजव्या बाजूनें डाव्या बाजूकडे जाणाऱ्या एका पायवाटेनें चालले आहेत.

**काळ** : मागील अंकांतील घटनेनंतर सहा वर्षांनीं ]

**अर्जुन** : (अभिमानानें) आतां आपणच म्हणतां, गुरुजी, कीं माझें अध्ययन पुरें झालें; तर मग आतां आपण दिलेल्या वचनाप्रमाणें, मी जगांतला सर्वश्रेष्ठ धनुर्धर झालों, असें समजायचें का मीं ?

**द्रोण** : ( अर्जुनाच्या बोलण्यांतला उत्साहाचा अतिरेक न आवडल्याचें स्पष्टपणें दर्शवीत ) वाटतें तसें मला बहुतेक——

**अर्जुन** : तर मग जगांतल्या कोणाचाहि मी आतां पराभव करूं शकेन. होय ना ? अर्थात् धनुर्विद्येच्या क्षेत्रांतच——

**द्रोण** : हां...परीक्षेंत जरूर...

**अर्जुन** : परीक्षेंत ? केवळ परीक्षेंतच नव्हे, गुरुजी, पण खऱ्याखुऱ्या युद्धांतसुद्धां. आतां मी जगांतला सर्वश्रेष्ठ धनुर्धर झालों; तेव्हां मी कोणाशींहि लढलों, तरी त्याला जिंकून ठार करायला मी समर्थ ठरलोंच पाहिजे, नाहीं का ? अर्थात् धनुर्विद्येंतच——

**द्रोण** : पार्था, कोणत्याहि परीक्षेंत आपल्या प्रतिस्पर्ध्याला तूं अवश्य हरवशील; पण खऱ्याखुऱ्या निकराच्या युद्धांत कुणालाहि तसें निश्चित सांगतां येणें कठिण आहे. ( प्रत्येक शब्द सावकाश आणि विचारपूर्वक उच्चारीत ) पार्था, परीक्षेच्या वेळीं विजयी कोण झाला आणि पराभूत कोण झाला, याचा निर्णय उमेदवारांच्या कौशल्यावर-आणि केवळ कौशल्यावरच अवलंबून असतो; पण खऱ्याखुऱ्या युद्धांत प्राण आणि मान दोन्हीहि पणाला लागलीं असल्यामुळें, त्याच्या निर्णयांत इतरहि अनेक घटकांचा समावेश होतो. आणि म्हणूनच युद्धाच्या पर्यवसानांत योद्ध्यांच्या वैयक्तिक कौशल्याला फारसें महत्त्व न उरतां, त्याहून अगदीं वेगळ्या अशा इतरच अनेक घटकांवर त्याचा निर्णय अवलंबून राहतो.

**अर्जुन** : ( भीतिग्रस्त स्वरांत ) पण, गुरुजी ! खऱ्याखुऱ्या निकराच्या युद्धांत, जर तें धर्मयुद्ध असेल-आणि त्यांत भाग घेणाऱ्या प्रतिस्पर्ध्यांची परिस्थिति सारखी असेल-तर दोघांपैकीं जो अधिक कुशल असेल त्याचा जय झालाच पाहिजे; त्यानें आपल्या प्रतिपक्ष्याचा वध केलाच पाहिजे; नाहीं का ?

**द्रोण** : ( खात्रीच्या स्वरांत ) नाहीं, नाहीं; पार्था. कोणतेंहि युद्ध, जर तें खरोखरच निकराचें असेल, तर तें कधींहि पूर्णपणें धर्मयुद्ध असूंच शकत नाहीं. आणि तूं म्हणतोस तशी समान परिस्थितिहि त्यांत कधीं राहूं शकत नाहीं. पार्था ! ही जाणीव जितक्या लवकर तुला होईल तितकें उत्तम; कारण कोणत्याहि अटीतटीच्या लढ्यांत भाग घेणारे प्रतिस्पर्धी, जरी एकमेकांचा जीव घेण्याला सारखेच उत्सुक असले, तरी तेहि परस्परांपासून अनेक दृष्टींनीं भिन्न असतात. त्याप्रमाणेंच ज्या हेतूंनीं ते त्या युद्धाला सिद्ध होतात, ते त्यांचे हेतूहि बऱ्या-वाइटाच्या अपेक्षेनें परस्परविरोधी असतात. आणि म्हणूनच ज्यानें सत्पक्षाचा त्याग करून असत्पक्षाचा आश्रय केलेला असेल, तो योद्धा शस्त्रास्त्रांच्या कौशल्यानें कितीहि वरचढ असला, तरी त्याला अपरिहार्यपणें प्राप्त होणारें अपयश आणि मरण तो टाळूं शकत नाहीं. आलें ध्यानांत तुझ्या, पार्था ?

**अर्जुन** : होय, गुरुजी, आलें. अगदीं पूर्णपणें आलें.

**द्रोण** : तर मग आपल्या सामर्थ्याच्या खोट्या अभिमानानें न्याय्य काय आणि अन्याय्य काय, हें ठरविणारी आपली विवेकशक्ति आंधळी होणार नाहीं, याची तूं नेहमीं खबरदारी घे. ( अकस्मात्

कोणा तरी वन्य पशूची कर्णकर्कश किंकाळी ऐकूं येते. ) आं ? कसला आवाज हा ?

**अर्जुन** : एखाद्या श्वापदाची–कोणा तरी हिंस्र पशूची आरोळी असावी; तें इकडेच येत असावेंसें दिसतें. ( क्षणार्धांत धनुष्यास बाण लावून पाठीमागच्या बाजूस जातो. थोडा वेळ तो प्रेक्षकांच्या दृष्टीआड असतो, पण लगेच परत येतो. त्याची हालचाल आणि स्वर यांवरून त्याची मनःस्थिति बरीच प्रक्षुब्ध झालेली दिसते. ) गुरुजी, लांडगा ! लांडगा आहे एक ! जीव बचावण्यासाठीं इकडेच पळत येतो आहे. कोणी तरी त्याचा पाठलाग करतो आहे ! आणि त्या लांडग्याच्या मस्तकाच्या खालच्या भागांतून एकामागून एक सारखे बाण मारतो आहे-तो पाहा. त्या तिकडे. तो बघा, गुरुजी.

( एक लांडगा वेगानें डावीकडून उजवीकडे पळत जातो. अर्जुनानें वर्णन केल्याप्रमाणें बाणांची एक अखंड पंक्ति त्याच्या मस्तकाच्या कवटीच्या खालील भागाचा भेद करून जात असलेली दिसते. दोघेहि आश्चर्यानें स्तंभित होऊन पाहात राहतात. )

**द्रोण** : पाहा, पार्था, पाहा ! हा महाधनुर्धर कोण असेल तो असो, त्या लांडग्याबद्दल त्याला भयंकर चीड वाटत असली पाहिजे, याबद्दल शंका नाहीं. नाहीं तर त्यानें त्याला एकाच बाणानें ठार केलें असतें ! आणि तें त्याला सहज शक्य होतें, हें निश्चित. पण तसें न करतां त्याच्या वेदना वाढविण्या-साठीं, आपल्या बाणांनीं तो त्याचा मेंदू कसा करवतून काढतो आहे, पाहा. पुरती तीस पावलांची मजल देखील त्या लांडग्यानें मारली नसेल तोंच कमींत कमी शंभर तरी बाण त्या धनुर्धरानें त्याच्या मस्तकांतून पार केले. आहाहा ! केवढा चमत्कार ! पार्था, हें हस्तलाघव पाहून मी थक्क झालों. माझ्या कल्पनेच्याहि कल्पनेपलीकडचें कौशल्य आहे हें !

**अर्जुन** : ( स्वगत ) गुरुजींच्या कल्पनेच्याहि कल्पनेपलीकडचें कौशल्य ? ( मोठ्यानें ) तर मग गुरुजी, धनुर्विद्येंत फारसा माझ्यामागें नाहीं म्हणायचा तो !

**द्रोण** : ( तिरस्कारयुक्त सहानुभूतीच्या स्वरांत ) फारसा तुझ्या मागें ? अहंकारी पोरा, तो धनुर्धर कोण असेल तो असो, पण तो तुझ्यामागें नाहीं; इतकेंच नव्हे, तर धनुर्विद्येंत तो तुझ्या आणि माझ्या दोघांच्याहि इतका पुढें आहे कीं, त्याच्या शरसंधानकौशल्याच्या योजनांच्या कक्षेंतहि आपण येऊं शकणार नाहीं. कोण असेल तो ! मनुष्य खास नव्हे !

**अर्जुन** : ( स्वतःशींच ) माझ्यापुढें ? गुरुजींच्या-हि पुढें ? ( मोठ्यानें ) कोणी का असेना ! तो कोण आहे हें पाहिलेंच पाहिजे. ( शरपरंपरेच्या उगमाच्या रोखानें झपाझप पावलें टाकीत आवेगानें चालूं लागतो. )

**द्रोण** : ( अर्जुनाला मागें खेंचीत ) मागें फिर, मूर्ख पोरा, मागें फिर. तो कोणीहि असला तरी या वेळीं, त्याच्या या मनःस्थितींत त्याला तोंड देणें, म्हणजे प्रत्यक्ष मृत्यूला मिठी मारणें आहे, हें कसें समजत नाहीं तुला ? ( अर्जुनहि चालू असलेल्या शरपरंपरेकडे अंगुलिनिर्देश करून ) ऐक. बाणाचा सणसणाट अधिकाधिक तीव्र होऊं लागला, क्षणा-क्षणाला तो अधिकाधिक आपल्या जवळ येतो आहे. चल; त्या झाडाच्या आड उभें राहून, तो आपल्या समोरून निघून जातांना आपण त्याचें नीट निरीक्षण करूं. ( दोघे मागें सरकून जवळील एका झाडाआड उभे राहतात. )

[ एकलव्य मध्यभागांतून डाव्या बाजूनें धावत येतो. त्याचा श्वास जोरानें चाललेला असतो. तो बरोबर मध्यावर येऊन उभा राहतो आणि ज्या बाजूला लांडगा पळून गेलेला असतो तिकडे रागानें दृष्टिक्षेप करतो. पळणाऱ्या लांडग्याच्या किंकाळ्या ऐकूं येत असतात. ]

**एक०** : मार. अशाच किंकाळ्या मार. हिंस्र श्वापदा ! शरिरांत असेल नसेल ती सारी शक्ति खर्च करून, मारवतील तितक्या जोरानें किंकाळ्या मार. वेदना असह्य होऊन तूं मारलेल्या या किंकाळ्यांनीं, काल दुपारभर ज्यांची तूं लांडगेतोड केलीस, त्या गरीब बिचाऱ्या पाडसांच्या अंतकाळ-च्या आरोळ्यांची तुला नुसती आठवण झाली, तरी आपल्या या यातनांतून मुक्त होण्यासाठीं पुरेसें दुःख तूं भोगलेंस, असें मी समजेन. बस् !








आतां करतोंच तुला ठार. ( धनुष्याला बाण जोडून उजव्या बाजूस नेम धरतो. इतक्यांत कांहीं विचार मनांत येऊन क्षणभर थांबून मृदु स्वरांत ) कदाचित् तुझीं कचींबचीं तुझ्या गुहेंत तुझी वाट पाहात असतील. ( कठोर स्वरांत ) तरीहि पण त्या हरिणांच्या पाडसांना तूं तसें जखमी करायला नको होतेंस. त्यांना मारायला नको होतेंस. ( बाण सोडतो. लांडग्याची मरणकाळची किंकाळी ऐकूं येते. हर्षानें ) बस् ! आतां आणखीं एक लांडगा–फक्त आणखीं एकच लांडगा ! त्याला ठार केलें कीं, माझें हें वन लांडग्यांच्या भीतींतून पुरतें मुक्त होणार–आणि मग दुसऱ्या अरण्याकडे वळायचें. तें झालें कीं, तिसऱ्या, चवथ्या, पांचव्या.–पृथ्वीवरील सर्व अरण्यें ह्या हिंस्र लांडग्यांच्या त्रासापासून मुक्त होईपर्यंत हें असेंच चालायचें.

[ द्रोण आणि अर्जुन यांचीं पावलें वाळलेल्या पाचोळ्यावर नकळत पडतात. त्यामुळें झालेला आवाज एकलव्याच्या कानीं येऊन तो नैसर्गिक सावधगिरीनें धनुष्याला बाण जोडून आवाजाच्या रोखानें नेम धरतो; पण द्रोणार्जुनांना पाहून धनुष्य खालीं करतो. ]

**एक० :** ओहो ! आपण ? क्षणमात्र मला वाटलें दुसरा लांडगाच आला. ( दोघांच्या जवळ येऊन द्रोणांना अभिवादन करतो. ) नमस्कार, महाराज. ( अर्जुनाकडे पहात हंसून ) नमस्ते कुमार. आपणां उभयतांकडे लक्षच गेलें नाहीं माझें ! त्या लांडग्याला हालहाल करून ठार मारल्याची खात्री करून घेण्याच्या उत्साहांत हा प्रमाद घडला. क्षमा असावी. त्या नादांत गुंतून गेल्यानें मला कांहीं दिसलें नाहीं. कांहीं ऐकूं आलें नाहीं ! तसें म्हटलें, तर त्या दुष्ट प्राण्याला मी केव्हांच ठार करूं शकलों असतों–पण तो एका कोंवळ्या नाजूक पाडसाच्या पाठीवर बसला होता आणि तें बिचारें पाडस जितें असतांनाच, काल सारी रात्रभर त्याचा मेंदू तो कुरतडून खात होता. त्या गरीब बिचाऱ्या असहाय पाडसाला ज्या भयंकर यातना सोसाव्या लागल्या असतील, त्या साऱ्या या लांडग्यालाहि सोसायला लावायच्या, असें मीं त्या वेळीं ठरविलें. ( स्मितपूर्वक स्वर बदलून ) पण बोलतांबोलतां मी फारच वाहात चाललों. क्षमा करा मला. माताजींच्या अतिथीबद्दलच्या आपल्या कर्तव्याचासुद्धां मला विसर पडला. पण माझें हें वन, माझे गुरुजी, माझे आई-वडील, माझीं हरिणें, त्यांचीं पाडसें, त्याचप्रमाणें या वनांतील इतर पशुपक्षी, यांच्याबद्दल मी बोलायला लागलों कीं, माझें नेहमींच असें होतें. इथें पोहोंचायला आपल्याला बरेंच दूर चालून यावें लागलें असेल. आतां आपण आणखी थोडे–अगदीं थोडे–चालण्याचे परिश्रम घ्याल, तर माझी आई आम्हां गरिबांच्या झोपडींत आपलें मोठ्या आदरानें स्वागत करील; आणि आपल्याला फळें आणि दूध– हो–आमच्या स्वतःच्या झाडांचीं पिकलेलीं रसाळ फळें आणि आमच्या घरच्या गाईचें गोड दूध अर्पण करील. ( द्रोण व अर्जुन एकलव्याची ती निर्व्याज ऋजुता पाहून एकमेकांकडे आश्चर्यानें बघतात. )

**अर्जुन :** ( दोघांतून प्रथम भानावर येऊन ) पण तूं खरोखरच मोठा अलौकिक धनुर्धर आहेस !

**एक० :** ( भावडेपणानें ) मी ? मी अलौकिक धनुर्धर ? खरेंच ? मला नाहीं वाटत; पण कोण जाणे. मला एवढेंच माहीत आहे कीं, मला जिथें बाण मारावासा वाटतो तिथें मी तो नेमका मारूं शकतों. बस् एवढेंच...

**अर्जुन :** पण आतां तूं दाखविलेलें तें कौशल्य– त्या श्वापदाच्या मस्तकाच्या कवटीच्या खालच्या भागांतून एकामागून एक अचूक बाण पार करण्याचें तें चातुर्य, बाणांच्या वर्षावाचा तो वेग, फारच आश्चर्यकारक ! खरोखरच अलौकिक ! ( उत्साहानें ) तो लांडगा पुरता तीस पावलें देखील पळाला नसेल, तेवढ्यांत निदान शंभर तरी बाण पार केले असशील त्याच्या मस्तकांतून. फारच आश्चर्यकारक !

**एक० :** ( सहजपणें ) त्याचें तुला इतकें आश्चर्य वाटलें ! त्याच्या निम्म्या वेळांत याच्या दुप्पट बाण मी सहज सोडूं शकेन. ( अर्जुनाच्या धनुष्याकडे बोट दाखवून ) तूं सुद्धां धनुर्धर आहेस, हें उघडच आहे. पण या असल्या मामुली कृतीला तूं अलौकिक म्हणून गौरवतोस, तेव्हां धनुर्विद्येंत








तुझी फारशी प्रगति झालेली नसावी. ( अर्जुन चमकतो तें पाहून ) क्षमा कर हं. स्वतःच्या कौशल्याच्या अभिमानानें, तुझ्या धनुर्विद्येला कमी लेखण्याचा हेतु नव्हता माझा; कारण मला मिळाला तसा श्रेष्ठ गुरु तुला धनुर्विद्या शिकवायला लाभला असता तर, तूंहि मला म्हणतोस तसा अलौकिक धनुर्धर झाला असतास.

[ द्रोण आणि अर्जुन साभिप्राय दृष्टीनें एकमेकांकडे पाहतात. ]

अर्जुन : कोण हा असा गुरु कीं, श्रेष्ठ श्रेष्ठ म्हणून त्याची एवढी वाखाणणी चालवली आहेस?

एक० : श्रेष्ठ ? छे छे ! ! नुसता श्रेष्ठ नव्हे; साऱ्या जगांतील सर्वश्रेष्ठ धनुर्धर. आणि ज्या क्षणीं त्यांना वाटेल त्या क्षणीं मीहि निखालस त्या पदाला पोंचेन.

**द्रोण** : ( स्वतःशींच ) याचा गुरु जगांतील सर्वश्रेष्ठ धनुर्धर ? कोण असावा बरें ? कांहीं कळत नाहीं.

**अर्जुन** : ( स्वतःशींच ) याचा गुरु जगांतील सर्वश्रेष्ठ धनुर्धर? मी तर समजत होतों कीं, तो मान माझा आहे. ( चिडक्या स्वरांत ) कोण हा तुझा गुरु ? तुझ्या मताप्रमाणें जगांत सर्वश्रेष्ठ धनुर्धर ठरणारा तो कोण आहे, तें कळूं दे तर खरें.

**एक०** : धनुर्विद्या आणि धनुर्धर यांच्याबद्दल तुला यत्किंचित्‌हि माहिती असती, तर तुझ्या ध्यानांत आलें असतें कीं, जगांतला सर्वश्रेष्ठ धनुर्धर, असें ज्याला वास्तविकपणें म्हणतां येईल, असा एक आणि केवळ एकच पुरुष आहे; आणि तो म्हणजे महाभाग द्रोणाचार्य—माझे गुरुवर्य. ( द्रोण आणि अर्जुन विस्मयचकित होतात. या अकल्पित विधानानें चिडून जाऊन अर्जुन तावातावानें बोलूं लागतो. )

**अर्जुन** : ( आवाज चढवून ) द्रोणाचार्य तुझे गुरु ? खोटें बोलतो आहेस तूं हें !

**एक०** : ( क्षणार्धांत अर्जुनाच्या मस्तकावर आपल्या बाणाचा नेम धरून, धगधगत्या नजरेनें त्याच्याकडे पाहात, मेघगर्जनेच्या स्वरांत ) माझे वडील मला धनुर्विद्या शिकवायला वांचले नाहींत; पण एकानें दुसऱ्याला तूं खोटें बोलतोस म्हणणें, म्हणजे त्याचा मोठा अपमान करणें, त्याच्यावर जास्तींत जास्त घाणेरडा आरोप करणें—आहे, हें समजावून देण्याइतकें दीर्घायुष्य त्यांना खास लाभलें होतें; आणि अशा माणसाचें तोंड कायमचें बंद करण्याचा एकच उपाय म्हणजे त्याला ठार करणें हा होय हेंहि त्यांनीं मला नीट शिकविलें आहे. पण, " कोणाचाहि प्राण घेण्यापूर्वी, तुझ्या वियोगानें जशी तुझी आई दुःखी होईल, तशीच त्याच्या मृत्यूनें बिचारी त्याची आईहि दुःखी होईल, हें ध्यानांत ठेव " असें माझी आई मला नेहमीं सांगत असते. बोल, आहे आई तुला ?

**अर्जुन** : ( क्षणमात्र गडबडून ) होय, आहे.

**एक०** : तर मग तुझ्या आईला पुत्रवियोगाचें दुःख होईल, या माझ्या भीतीचा भलता फायदा घेऊन, " तूं खोटें बोलतोस " असें मला म्हणण्याचें भलतें साहस तूं करूं नयेस, हें चांगलें. असें पाहा, मी तुला काय म्हणून खोटें सांगेन ? आई नेहमीं म्हणते कीं, माणूस खोटें बोलतो तें केवळ खरें सांगायचें त्याला भय वाटतें म्हणून. पण मला तसें भय कां वाटावें ? आतां ज्या या माझ्या धनुर्विद्येचा तूं गौरव केलास, तेवढीच केवळ नव्हे, तर तुला अजून जिचें दर्शनहि झालेलें नाहीं, अशीहि माझी सारी धनुर्विद्या मला माझ्या गुरुदेवांकडून—द्रोणाचार्यांकडूनच प्राप्त झालेली आहे. मीं जें तुला सांगितलें, तें सत्य आहे. निखालस सत्य आहे—त्रिवार सत्य आहे.

**अर्जुन** : ( द्रोणाला हलक्या आवाजांत ) हा असें खोटें कां बोलतो आहे, गुरुजी ? आणि तरी सुद्धां त्याच्या आविर्भावावरून, त्याच्या स्वरावरून, असें वाटतें कीं, बहुशः हा खरें सांगत असावा. आम्हां कुरुकुमारांव्यतिरिक्त दुसऱ्या कोणाला कधीं आपण अस्त्रविद्या शिकविली होती का, गुरुजी ?

**द्रोण** : अर्थात् नाहीं. मूर्खा, याला कधीं पाहिल्याचें सुद्धां मला स्मरत नाहीं. ( थोडा वेळ चिंतन आणि निरीक्षण करतो. ) आणि तरीहि, तूं म्हणतोस त्याप्रमाणें, त्याच्या मुद्रेवरून, त्याच्या स्वरावरून, आपण बोलतों तें सत्य आहे, अशा विश्वासानेंच तो बोलतो आहे, असें दिसतें खरें...पण... ( एकलव्याचा चेहेरा आणि आकृति यांचें सूक्ष्म



अनुक्रमणिका






निरीक्षण करून ) माझी खात्री आहे. याला मीं कधींहि धनुर्विद्येचे पाठ दिल्याचें मला नाहीं स्मरत.

**अर्जुन** : मला त्याबद्दल मुळींच शंका नाहीं, गुरुजी. खरें म्हणजे मीं तुम्हांला विचारायलाच नको होतें. ( एकलव्याला उद्देशून ) तुझ्या हातांत धनुष्य असलें, तरी तुला तोंड द्यायला मला मुळींच भय नाहीं. आणि म्हणूनच मी म्हणतों कीं, द्रोणाचार्यांनीं आपल्याला विद्या शिकविली, असें तूं सांगतोस तें खरें असेल, तर तें तसें नाहीं, असें म्हणण्यांत ते स्वतःच खोटें बोलत असले पाहिजेत.

**एक०** : ( अर्जुनाच्या वक्षःस्थलावर नेम धरून संतप्त मुद्रेनें ) मलाच नव्हे, तर माझ्या गुरूलाहि खोटें बोलणारा म्हणतोस ? हें असह्य आहे. आतां तुला ठार केलेंच पाहिजे.

**अर्जुन** : पण आपण तुला धनुर्विद्या कधींच शिकविली नाहीं, असें प्रत्यक्ष द्रोणाचार्यच सांगतात त्याचें काय ?

**एक०** : ( आश्चर्यानें ) माझे गुरुजी असें म्हणाले ? तुला ? कधीं ? कुठें ?

**अर्जुन** : ( विजयी मुद्रेनें ) इथें. आतां. तुझ्या समक्ष, विचार त्यांना ! ( द्रोणाचार्यांकडे बोट दाखवितो. )

**एक०** : यांना ! या अनोळखी गृहस्थांना ! मी नाहीं यांना ओळखीत.

**अर्जुन** : ( चेष्टेच्या स्वरांत ) वाटलेंच मला. तूं त्यांना ओळखीत नसणारच ! आणि तरी सुद्धां मारे प्रतिज्ञेवर सांगत होतास कीं, मी त्यांना चांगलें ओळखतों-फारा दिवसांपासून ओळखतों-आपली धनुर्विद्या त्यांच्याकडून शिकलों--

**एक०** : यांच्याकडून धनुर्विद्या शिकलों ? या अनोळखी गृहस्थांकडून ? ( द्रोणांकडे न्याहाळून पाहतो. हळूहळू त्याच्या डोळ्यांत ओळख पटल्याची चमक दिसूं लागते. अर्जुनाला क्षमायाचनेच्या स्वरांत ) माझ्या उतावळेपणाची क्षमा कर मला. नाहीं. अनोळखी नाहीं. तेच हे माझे पूज्य गुरुजी. ( द्रोणांपुढें साष्टांग नमस्कार घालून त्यांचे गुडघे कवटाळतो. ) आज इतकीं वर्षे आपल्यासाठीं माझें अंतःकरण तळमळत होतें. आपली भेट व्हावी, आपल्या कृपेनें मला जें कांहीं शिक्षण मिळालें, त्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करावी, यासाठीं मी आपली किती उत्कंठतेनें वाट पाहात होतों, याची आपणाला कल्पना नाहीं यायची, गुरुजी ! ( उठून द्रोणांचा हात हातांत घेऊन ) आपल्या या वनांत माझे पूज्य गुरुजी आले आहेत, ही वार्ता समजतांच माझी आई खचित आनंदानें वेडावून जाईल ! धनुष्य-बाणांच्या साहाय्यानें मी काय करूं शकतों, हें आतां आपण पाहिलेंतच. माझ्यासारख्या क्षुद्र माणसाला धनुर्विद्येचे पाठ देऊन, आपण माझ्यावर जो कृपेचा वर्षाव केलात, तो वायां गेला नाहीं असें आपल्याला वाटतें का ? आतां फक्त आणखी एकाच लांडग्याला ठार केलें कीं, हें सारें अरण्य हिंस्र श्वापदांच्या भयापासून पूर्णपणें मुक्त होईल. आपण प्रेमानें दिलेल्या पाठांना पात्र होण्यासाठीं, मीं किती निष्ठेनें प्रयत्न केले, याची यावरून आपणांस कल्पना येईल. ( अर्जुनाकडे बोट करून ) हा अनोळखी कुमार आतांच मला अलौकिक धनुर्धर म्हणाला. हस्तकौशल्याचा एक साधारणसा चमत्कार पाहून, जर त्याच्या तोंडून असे आश्चर्याचे उद्गार निघतात, तर खरोखरच मनापासून, गंभीरपणानें धनुष्यबाणांचा उपयोग करतांना त्यानें मला पाहिलें, तर श्वास कोंडून गुदमरून जायची पाळी येईल त्याच्यावर. त्याला आपली चांगलीच माहिती आहे, असें दिसतें. तरीहि पण त्याला उमजलेलें दिसत नाहीं कीं, या साऱ्या जगांत केवळ एकच गुरु आहे कीं, जो मीं त्याला दाखविली, त्या प्रकारची धनुर्विद्या शिकवूं शकतो. आणि तो एक-आपणच. माझ्या धनुर्विद्येसाठीं मी आपला ऋणी आहें, ही खरीखुरी गोष्ट मी कबूल करतांच, कां कुणास ठाऊक, मला तो पोरकटाप्रमाणें, ' तूं खोटें बोलतोस, ' असें म्हणाला. ( संतापानें अर्जुनाला ) आई कांहींहि म्हणाली आणि तूं जरी माझा अतिथि असलास, तरी माझ्या या गुरूंच्या साक्षीनें, त्यांची निंदा करणाऱ्या या तुझ्या ओठांतून माझ्या बाणांचे भाते मी रिते केल्यावांचून राहणार नाहीं. चल. कर आपलें धनुष्य सज्ज. पाहूं या, तुला त्याचा कितीसा वापर करतां येतो तें.

**अर्जुन** : ( कांहींशा अनिच्छेनें पण तात्काळ बाण धनुष्यास जोडतो ) तुला युद्धाची खुमखुमीच








असेल, तर मी ती पुरती जिरवितों. पण हें मात्र तूं विसरूं नकोस कीं, ज्यांना तूं आपले गुरुजी म्हणतोस, ते तुझे गुरुजीच स्वतः सांगतात कीं, त्यांनीं तुला कधींच धनुर्विद्या शिकविली नाहीं.

**एक०** : नाहीं म्हणाले ते तसें. म्हणणें शक्यच नाहीं. एवढ्या आस्थेनें, इतक्या जिव्हाळ्यानें आणि प्रत्यक्ष कधीं माझ्याजवळहि न येतां, मला त्यांनीं हें सारें शिक्षण दिलें; आणि आतां मला शिष्य म्हणून कबूल करायचें कां नाकारतील ते ?

**द्रोण** : ( एकलव्याला ) तुझ्या जवळहि न येतां तुला शिक्षण दिलें ! मला नाहीं समजत तूं काय म्हणतोस तें !

**एक०** : ( मोठ्यानें हंसून ) खरें आहे; आपल्याला नाहींच समजायचें तें, गुरुजी. इतक्यांत नाहीं, पण लवकरच ध्यानांत येईल तें आपल्या. कृपा करून आपण थोडे इकडे, या बाजूला याल तर–( जवळ असलेल्या एका पर्णाच्छादित उंचवट्याकडे जातो. द्रोण व **अर्जुन** त्याच्या मागें जातात. ते जवळ येतांच एकलव्य हळुवारपणें त्या उंचवट्यावरील सपर्ण शाखा दूर करतो. त्या बाजूला होतांच त्यांच्याखालीं दडलेली एक मातीची मूर्ति दिसूं लागते. मूर्तीची घडण ओबडधोबड असली, तरी द्रोणांची आकृति आणि चेहरा यांच्याशीं असलेलें तिचें साम्य लपण्यासारखें नाहीं. )–आतां आपल्या ध्यानांत आलें असेल, गुरुजी. आलें ना ?

**द्रोण** : ( थोडा वेळ मूर्तीकडे निरखून पाहिल्या-वर किंचित् स्मितपूर्वक ) होय. आलें आतां माझ्या ध्यानांत.

**अर्जुन** : ( अधिकच बुचकळ्यांत पडून चिड-खोरपणानें ) पण माझ्या नाहीं ध्यानांत आलें, गुरुजी.

**एक०** : कां कोण जाणे, तुझा आवाज पूर्वी कधीं ऐकल्यासारखा वाटतो ! आणि माझ्या गुरुजींना तूंहि गुरुजीच म्हणतोस ! ( थोडा वेळ विचार करीत स्तब्ध राहतो. त्याची नजर अर्जुनाच्या चेहेऱ्यावर खिळलेली असते. एकाएकीं त्याच्या डोळ्यांत ओळख पटल्याची चमक दिसूं लागून मोठी मौज वाटल्याप्रमाणें तो हंसत बोलूं लागतो. ) हाः ! हाः ! ! हाः ! ! ! आतां आठवलें. तो घमेंडखोर, महत्त्वाकांक्षी आर्यकुमार पार्थच तूं ! गुरुजी तुला पाठ देत असतांना, ते मीं पाहिले, तर मी तुझ्याहून अधिक मोठा धनुर्धर होईन, अशी भीति वाटून माझा मत्सर वाटला होता तुला. तुलाहि आठवलें असेल आतां. होय ना ! ( थोडा थांबतो. अर्जुनाच्या मुद्रेवर ओळख पटल्याचीं–संतापाचीं चिन्हें पाहून ) तुझी साधना चालली असतांना, तिचें निरीक्षण करण्याची संधि तेव्हां तूं मला नाकारलीस आणि तरीहि माझ्या प्रेमळ आणि पूज्य गुरुजींच्या कृपेनें ( आपलें धनुष्य आणि बाणांचे भाते यांना साभिप्राय स्पर्श करीत ) तुला अखेरीस दिसायचें तें दिसलेंच.

**अर्जुन** : ( एकलव्याकडे लक्ष न देतां चिडून द्रोणाकडे वळतो आणि मातीच्या पुतळ्याकडे बोट दाखवून ) हें पाहून आपल्या काय ध्यानांत आलें म्हणत होतां आपण, गुरुजी ?

**द्रोण** : या मूर्तीच्या दर्शनानें पार्था, कधींहि हस्तिनापुर न सोडतां, मी त्याला त्याची विद्या कशी शिकविली असेल, याचा उलगडा व्हायला मला बरीच मदत झाली.

**अर्जुन** : तरी पण, अजूनहि माझ्या ध्यानांत येत नाहीं कीं, इतकीं सारीं वर्षें आपण सारखे आमच्या नजरेसमोर असतांना, आपण येथें येऊन त्याला कसे––

**द्रोण** : ( रूक्षपणानें ) विचार, पार्था, त्यालाच विचार कीं !

**एक०** : ( उत्सुकतेनें ) विचारण्याची कांहींहि गरज नाहीं. गुरुजींच्या कृपेची माहिती केव्हां एकदां त्याला सांगेन, असें मला झालें आहे. ( पुतळ्याजवळ जाऊन आपले बाहू प्रेमानें त्याच्या-भोंवतीं टाकतो. ) गुरुजी कदाचित् इतकीं वर्षें तुझ्या दृष्टीआड कधींच झाले नसतील; आणि तरी पण, या इथें सारा वेळ ते माझ्याजवळच होते. त्या साऱ्या वर्षांतील प्रत्येक क्षणन् क्षण ते इथें आहेत आणि माझ्या धनुर्विद्येतला कणन् कण त्यांनींच मला शिकविला आहे.

**अर्जुन** : ( दृष्टि, स्वर आणि मुद्रा यांनीं पूर्ण अविश्वास दाखवीत ) या मातीच्या पुतळ्यानें तुला तुझी विद्या शिकविली, या गोष्टीवर माझा विश्वास बसेल, असें वाटतें तुला ?

**एक०** : ( दृष्टि आणि मुद्रा कठोर करून )



अनुक्रमणिका






माझ्या गुरुजींसंबंधीं बोलतांना आपण कोणते शब्द वापरतों याची काळजी घे. माझ्याप्रमाणें गुरुजींवर तुझें प्रेम आणि भक्ति नाहीं, म्हणून तुझ्या दृष्टीला हा एक मातीचा पुतळा दिसत असेल; पण माझें सर्वस्व मला त्याच्याकडून प्राप्त झालें असल्यामुळें तोच माझे गुरुजी ! माझ्या धनुर्विद्येबद्दल तुला कौतुक, आदर–निदान मत्सर तरी वाटत असेल, तर आपल्या धनुष्य-बाणांनीं मी जें साध्य करूं शकतों, तें कसें करायचें हें ज्यांनीं मला शिकविलें, त्या माझ्या गुरुंबद्दल तुलासुद्धां आदर दाखवलाच पाहिजे.

**अर्जुन** : ( एकलव्याच्या निष्ठेचा मनावर परिणाम होऊन कुतूहलानें ) पण हें चिखलाचें बाहुलें, नव्हे–हा तुझा गुरु, हें–नव्हे हा–हा तुला कांहींहि शिकवूं कसा शकला असेल ? कारण तें–नव्हे तो–हलूं शकत नाहीं, कीं बोलूंहि शकत नाहीं.

**एक०** : खरें सांगूं ? मलासुद्धां तें मोठें कोडें आहे. गुरुजी कधीं एक शब्दसुद्धां बोलले नाहींत, आणि तरीसुद्धां सारखी प्रगतीच होत होती माझी अभ्यासांत. पण आईला मात्र याचें मुळींच आश्चर्य वाटलें नाहीं. ती म्हणे, "तुझ्या गुरुवरची तुझी उत्कट भक्ति आणि तुला शिकविण्यांत त्यांना वाटणारा आनंद, या दोहोंमुळेंच तुला त्यांच्या त्या हंसऱ्या, अबोल ओठांतून धनुर्विद्येचें पाठ घेणें सोपें जातें."

**अर्जुन** : ( समाधान न होऊन ) अजूनहि तूं काय म्हणतोस, तें ध्यानांत येत नाहीं माझ्या.

**एकलव्य** : नाहीं येत ? तर मग ऐक, काय सांगतों तें. ( पुतळ्याच्या पायथ्यावर हात ठेवून त्याच्या तळाशीं असलेल्या कोनाड्यासारख्या एका खांचेंतून आपलीं बोटें फिरवितो. समोरुन आणि वरुन उघडा आणि एकाद्या जाड लांकडी दांडक्यानें ठोकल्याप्रमाणें खडबडीत आणि खोलगट बनलेला असा हा भाग आहे. ) पाहिलीस ही खांच ? पुनः पुन्हां माझें कपाळ इथें आपटल्यामुळें ती बनलेली आहे. गुरुजींकडून विद्यासंपादन करण्याच्या माझ्या प्रयत्नांतील, कठिणांतील कठिण भाग कोणता असेल, तर तो एवढाच. बाकी सगळें अगदीं सोपें. त्याचें असें झालें–मी कशावर तरी नेम धरून बाण सोडीं. माझा नेम चुकला, लक्ष्यवेध झाला नाहीं, तर मी गुरुजींजवळ जाईं–मला साह्य करण्यासाठीं त्यांची प्रार्थना करीं आणि मग परत येऊन फिरुन प्रयत्न करीं. त्याहि वेळीं पुन्हां चूक झाली, तर भरल्या डोळ्यांनीं मी पुन्हां गुरुजींच्या जवळ जाईं आणि त्यांच्या पायाशीं आपलें कपाळ आपटून, माझ्या मदतीला येण्यासाठीं, अगदीं मनोभावानें कळवळून त्यांची प्रार्थना करीं. आणि मग त्यानंतर पुन्हां प्रयत्न केला कीं, तो मात्र कधींहि विफल होत नसे. मग मी त्याहूनहि अधिक कठिण गोष्ट साध्य करण्याच्या उद्योगाला लागें. आणि त्यांत जेव्हां अपयश येई, तेव्हां माझ्या डोळ्यांतील पाण्याला अधिकाधिक भरती येई. माझ्या प्रार्थना अधिकाधिक करुण होत; आणि गुरुजींच्या पायाजवळील हा खळगा जास्त जास्त खोल होत जाई. त्या लांडग्याला तशा रीतीनें मारण्यांत, मीं मोठें आश्चर्यकारक कौशल्य दाखविलें, असें तुला वाटलें; पण तें कांहींच नव्हे. मी खरोखर मनःपूर्वक शरसंधान करीत असतांना, तूं मला पाहायला हवें होतें. रात्रीच्या वेळीं अंधारांतसुद्धां मी लक्ष्यवेध करूं शकतों. दिवसा डोळे बांधून करूं शकतों. नजरेला दिसत नसतांहि, केवळ आवाजावरुन ज्याचें अस्तित्व समजतें, अशा कोणत्याहि पदार्थांचा मी सहजपणें वेध करूं शकतों.

**अर्जुन** : ( चिडखोरपणें त्याला मध्येंच आडवून ) हं ! तूं काय करूं शकतोस आणि काय नाहीं, याचें मला मुळींच कौतुक नाहीं. ( द्रोणांकडे वळून संतप्त स्वरांत ) गुरुजी, आपण मला दिलेल्या वचनाचें काय ?

**द्रोण** : ( हा वेळपर्यंत एकलव्याचें बोलणें ऐकण्यांत गढून गेलेला असतो. त्या तंद्रींतून एकदम भानावर आल्याप्रमाणें ) वचन ?...कसलें वचन ?

**अर्जुन** : ( भांडखोरपणानें ) पाहा. या जंगली माणसाच्या कौशल्याच्या कौतुकांत आणि तें त्याला शिकविण्याच्या आपल्या अलौकिक पद्धतींत, आपण इतके गर्क होऊन गेला आहां कीं, आपल्याला कशाचेंच भान उरलें नाहीं. आपल्या वचनाला सुद्धां आपण पारखे झालां आणि आतां इतक्यांत आपण मला आश्वासन देत होतां कीं, आपण त्याचें परिपालन केलें आहे म्हणून ! आपण मला वचन










दिलें होतें, गुरुजी, कीं आपण मला जगांतला सर्वश्रेष्ठ...मी काय म्हणतों तें आपल्याला माहित आहे, गुरुजी.

**द्रोण** : ( गोंधळून असहायपणें ) पण, पार्था ! आतांपर्यंत तूं जें कांहीं ऐकलेंस-पाहिलेंस, त्यावरून तुझ्या ध्यानांत–

**अर्जुन** : (तोल सुटून ) नाहीं. कांहींहि ध्यानांत नाहीं आलें माझ्या. ( मत्सराच्या आवेगामुळें स्वतःवरील ताबा सुटून, सर्व शिष्टाचार विसरून, एकाद्या वायु झालेल्या माणसाप्रमाणें मोठ्यानें ओरडत ) मी एवढेंच जाणतों कीं, आपण मला जगांतला सर्वश्रेष्ठ धनुर्धर करण्याचें वचन दिलें होतें, आणि तें वचन आपण पाळलें नाहीं. आणि त्याहूनहि अधिक वाईट गोष्ट म्हणजे आतां, इतक्यांत, वास्तविक आपण आपलें वचन पाळलें नसतांहि, तें पाळलें असल्याचें आपण मला आश्वासन दिलें. तेव्हां आपण खोटें बोललां, निव्वळ खोटें बोललां; दुसरें कांहींहि नाहीं.

**एक०** : ( अर्जुनाच्या छातीवर बाणाचा नेम धरुन गर्जना करीत ) मागें घे, मागें घे आपले शब्द. नाहीं तर प्राण घेईन तुझा मी !

**अर्जुन** : ( धनुष्य सरसावीत )पण मी प्रतिकाराचा प्रयत्न केल्यावांचून खास राहाणार नाहीं.

**द्रोण** : ( दोघांचे मध्यें येऊन ) काय हा वेडेपणा, पार्था ! शांत हो, बाळ !

**अर्जुन** : ( द्रोणांना ) जगांतील सर्वश्रेष्ठ धनुर्धर करण्याचें वचन तुम्हीं नव्हतें दिलें मला, गुरुजी ?

**द्रोण** : होय. दिलें होतें.

**एक०** : अर्थात् दिलें होतें. कित्येक वर्षांपूर्वी त्यांनीं तसें वचन दिलें, तेव्हां मीहि तिथें होतों. पण याचा अर्थ असा नव्हे कीं, अजूनहि ते तें पाळणार नाहींत.

**अर्जुन** : गुरुजी, या निषादाच्या धनुर्विद्येचा जो मासला आतां आपण पाहिला, तो पाहूनहि, आपण मला तेव्हां दिलेलें वचन आपण पाळलें, किंवा यापुढेंहि तें आपण पाळूं शकाल, असें आपल्याला तरी वाटतें का ?

**द्रोण** : ( उतावळा झालेल्या एकलव्याला आवरीत, गंभीर स्वरांत ) पण पार्था ! तुझें अंतःकरणच तुला साक्ष देईल कीं जेव्हां मीं तुला तें वचन दिलें, तेव्हां तें पाळण्याचा माझा निर्धार होता. आणि आतां इतक्यांत, मीं तें पाळलें आहे, असें तुला आश्वासन दिलें तेव्हां खरोखरच माझा तसा विश्वास होता. तूं अनादरानें माझ्यावर खुशाल आरोप कर. पण अजाणतां उच्चारलेलें अकल्पित असत्य, त्या प्रकारचा खोटेपणा ठरूं शकत नाहीं.

**अर्जुन** : ( अजूनहि भांडखोरपणानें ) अकल्पित असो किंवा कल्पित असो; –मी एवढेंच जाणतों कीं, आपण मला दिलेलें वचन आपण पाळलें नाहीं. शिवाय गुरुजी, आतां एका क्षणापूर्वींच आपण म्हणालां कीं, आपण आणि मी या दोघांपेक्षांहि तो धनुर्विद्येंत फार फार पुढें आहे. आपण दोघे म्हणतां त्याप्रमाणें, जर त्याची धनुर्विद्या त्यानें आपणापासून प्राप्त करून घेतली, तर आपणाहूनहि त्याला अधिक श्रेष्ठ ठरविणारी धनुर्विद्या, त्याला आपणाकडून कशी शिकतां आली ?

**द्रोण** : ( विचाराक्रांत स्वरांत ) तेंच कोडें सोडवण्याचा मी प्रयत्न करतों आहें, पार्था. या कुमारानें हस्तगत केलेली सारी धनुर्विद्या मींच त्याला नकळत शिकविली असली पाहिजे, हें जरी मला पटलें, तरी त्याला माझ्याहूनहि वरचढ व्हायला मी कशी मदत करूं शकलों असेन, याचा मलाहि उलगडा होत नाहीं.

**एक०** : ( मोकळेपणानें हंसून ) मी सुद्धां प्रथम असाच मोठ्या गोंधळांत पडलों होतों, गुरुजी. आणि म्हणूनच मी आपल्या आईला मधून मधून विचारीं कीं, "ज्यांच्यापासून मी विद्या शिकणार, ते गुरुजी स्वतःच अजून धनुष्य-बाणांचा उपयोग करीत असतांना, मी, त्यांचा शिष्य-जगांतील सर्वश्रेष्ठ धनुर्धर कसा होऊं शकेन ?". पण आई प्रत्येक वेळीं सांगे कीं, 'शिष्याचा विद्यासाधनाचा उद्देश, त्याच्या गुरूनें आपल्या गुरुकडून विद्यासंपादन करतांना मनांत धरलेल्या उद्देशापेक्षां अधिक उदात्त असेल, तर गुरूला येत असलेल्या विद्येपेक्षांहि अधिक विद्या, त्या शिष्याला गुरुकडून संपादन करतां येईल.'

**द्रोण** : केवढें आश्चर्य !

**अर्जुन** : आपल्याला हें मोठें आश्चर्य वाटत असेल, गुरुजी. पण हें सारें शब्दजंजाल आपल्यावरील संकटांतून आपल्याला वाचवूं मात्र शकत नाहीं.

**एक०** : ( अविश्वासानें ) गुरुजींवर संकट ? ( हंसून ) कसलें संकट ?

**अर्जुन** : अर्थात् वचनभंगाबद्दल साऱ्या जगाच्या कुचेष्टेचा विषय होण्याचें. ( तिरस्कारानें ) आतां, तूं केवळ जंगली निषाद असल्यामुळें तुला त्याची कांहीं खंत नाहीं वाटणार म्हणा !-पण-गुरुजींचें तसें थोडेंच आहे ! ते प्रथितयश, आर्य ब्राह्मण आहेत. असत्यवक्ता म्हणून लोकांनीं नाकें मुरडण्याची अपकीर्ति कपाळीं यावी, ही त्यांच्या दृष्टीनें फार मोठी आपत्ति आहे.

**एक०** : थांब. ( द्रोणांना ) हा बोलतो तें सत्य आहे का, गुरुजी ?

**द्रोण** : ( दृष्टि वळवून ) होय बाळ ! अगदीं शब्दन् शब्द !

**एक०** : ( दुःखानें सद्गदित होऊन ) पण असें होईल कसें, गुरुजी ? तसें होतां कामा नये. कांहींहि, कसेंहि करून, आपण आपलें वचन पाळलेंच पाहिजे, गुरुजी.

**द्रोण** : पण तें कसें पाळायचें, वत्सा ? या बाबतींत मी लाचार आहें. जें करायचें पत्करलें, त्याचा कठिणपणा आधींच ध्यानांत न घेतां, अविचारानें–अहंकारानें तसें वचन त्याला मी देऊन चुकलों. आतां त्या मूर्खपणाचा मोबदला मला द्यावा लागावा, हें केव्हांहि न्याय्यच होय.

**एक०** : पण गुरुजी, आपण एवढे थोर-एवढे सुज्ञ—

**द्रोण** : सुज्ञ ! कुमार, आयुष्यांतल्या सगळ्याच क्षणीं, सारखाच सुज्ञ ठरणारा कोणीच नाहीं; आणि म्हणूनच, माझ्या मूर्खपणाच्या--गैरसावधपणांतील क्षणाच्या प्रमादाचें प्रायश्चित्त मला भोगलेंच पाहिजे.

**एक०** : केवळ आपल्या मूक उपस्थितीनें जर आपण मला एवढें शिकवूं शकलां, तर–( पुतळ्याकडे पाहून ) तर-आपल्या साक्षात् अध्यापनानें आपण त्याला माझ्यापेक्षां किती तरी अधिक प्रवीण करूं शकाल, आणि आपलें वचन खरें होईल, नाहीं का ?

**द्रोण** : वत्सा, अध्ययन आणि अध्यापन हीं सर्वस्वीं केवळ गुरूच्याच हातीं असतीं, तर त्याला मी तुझ्याहून वरचढ करूं शकलों असतों पण तूं स्वतः दाखवून दिल्याप्रमाणें, शिष्यानेंसुद्धां त्या कार्यांतला आपला वांटा पुरा करायला हवा.

**एक०** : समजलों. आपण आपल्याबद्दलच्या त्याच्या प्रेमाच्या आणि आदराच्या भावनेबद्दल बोलतां आहां -पण धनुर्विद्येंत निष्णात व्हावें, अशी त्याची इच्छा असल्यामुळें, माझी खात्री आहे, तो आपली अत्यंत आदरानें--

**द्रोण** : तुला अजून सारें कळलें नाहीं, वत्सा. केवळ गुरूबद्दल आदर आणि प्रेम, एवढेंच पुरेसें नसतें. जो प्रधान उद्देश दृष्टीपुढें ठेवून शिष्य विद्या शिकतो तो उद्देश सर्वांत अधिक महत्त्वाचा असतो. शिष्य किती शिकतो, हें त्यावरून ठरतें. थोड्या वेळापूर्वीं, तूं स्वतःच हें सांगितलेंस. त्याचा विद्यार्जनाचा उद्देश तुझ्यापेक्षां फारच निकृष्ट असल्यामुळें, त्याला निदान तुझ्या बरोबरीलाहि आणण्याचे, त्याचे आणि माझे- दोघांचेहि—सारे प्रयत्न अपुरेच पडतील.

**एक०** : तर मग त्याचा धनुर्विद्या शिकण्याचा उद्देश--

**द्रोण** : अगदीं आरंभापासून एवढाच होता कीं, महाधनुर्धर म्हणून वैयक्तिक कीर्ति मिळवावी; जगांतील सर्वश्रेष्ठ धनुर्धर म्हणून लोकांनीं आपली वाहवा करावी; न भूतो न भविष्यति असा योद्धा म्हणून आपली स्तुति व्हावी. याच्याउलट, अरण्यांतील निष्पाप प्राण्यांना हिंस्र पशूंच्या भीतीपासून मुक्त करण्यासाठीं, काया-वाचा-मनांनीं प्रयत्न करण्याचा उद्देश तूं ठेवला होतास. त्यानें प्रयत्नांची कितीहि पराकाष्ठा केली, तरी तुझ्या धनुर्विद्येच्या कौशल्याच्या आसमंतांत तो योजनांच्या टप्प्यांतहि येऊं शकणार नाहीं; आणि अविचारानें मीं त्याला दिलेलें वचन, मीहि कधीं पुरें करूं शकणार नाहीं.

**एक०** : ( मस्तक नम्र करून ) आणि या साऱ्या अनर्थाला कारण मी झालों...

**द्रोण** : तूं ? कसा, बाळ ?



अनुक्रमणिका








**एक०** : खरेंच, गुरुजी, मी आपल्याकडे आलोंच नसतों, तर किती चांगलें झालें असतें ! मीं धनुर्विद्येची साधना कधीं केली नसती, तर तो जगांतला सर्वश्रेष्ठ धनुर्धर ठरला असता; होय ना, गुरुजी ?

**द्रोण** : होय, पण——

**एक०** : तर मग, गुरुजी, आपण आपलें वचन पुरें करूं शकलां नाहीं, याला कारण मीच झालों, असाच अर्थ नव्हे का ?

**द्रोण** : ( त्याचें सांत्वन करीत ) पण कांहीं जाणूनबुजून नव्हे, कुमारा. जाणूनबुजून नव्हे——

**एक०** : ( अर्जुनास ) यापुढें उभ्या आयुष्यांत, मी पुन्हां कधीं धनुष्याला स्पर्शदेखील करणार नाहीं, असें मी तुला वचन देतों. तसें झालें कीं, तूं आपोआप जगांतला सर्वश्रेष्ठ धनुर्धर ठरशील आणि माझ्या गुरुजींना आपलें वचन पाळायला मदत होईल.

**अर्जुन** : फारच थोडा संभव आहे तसा. कारण तूं म्हणतोस त्याप्रमाणें तूं धनुष्याला स्पर्श केला नाहींस, तरीहि जेव्हां जेव्हां आणि जिथें जिथें, मी धनुष्य-बाण सज्ज करीन, तेव्हां तेव्हां, कोणत्या तरी एका अरण्याच्या कोंपऱ्यांत, कुठें तरी, असा एक निषादकुमार आहे कीं, जो त्याची इच्छा असेल, तर माझ्यापेक्षांहि अधिक सफाईनें आपल्या धनुष्याचा वापर करूं शकेल, अशी कल्पना माझ्या मनांत आल्याशिवाय राहणार नाहीं. अशी स्थिति असतांना, मी जगांतील सर्वश्रेष्ठ धनुर्धर आहें, असें म्हणणें खरोखरच अत्यंत कठिण आहे. आणि तसें आहे, तोंपर्यंत गुरुजींचीहि या लोकापवादापासून सुटका नाहीं कीं, ते असत्यवादी——

**एक०** : ( त्याला अडवून ) चूप, जीभ आवर !

**अर्जुन** : कां ? मी कां चूप बसूं ? मी बोललों त्यांतलें अक्षरन् अक्षर खरें आहे. आणि साऱ्या जगाला तें समजलेंच पाहिजे. आपल्याला सत्याचें भय वाटत नाहीं, असें मोठ्या तोऱ्यानें सांगत होतास ना ? मग आतां त्याला कां भितोस ? जरूर मी तें साऱ्या जगाला ओरडून सांगेन; आणि मला कोणीहि आडवूं शकणार नाहीं.

**एक०** : ( हताशपणें हात चोळीत ) कोणी तरी, कांहीं तरी करून, याचें तोंड बंद केलेंच पाहिजे. याला आडवलेंच पाहिजे.

**अर्जुन** : ( मत्सरातिरेकानें वेडावलेला ) मला आडवलें पाहिजे ? सत्य काय आहे, तें जगाला जाहीर करण्यापासून मला आडवलें पाहिजे ? महाभाग द्रोणाचार्यांनीं आपलें वचन मोडलें, हें साऱ्यांना सांगण्यापासून मला आडवलें पाहिजे ! पाहूंच दे मला कोण आडवतें तें !

( अर्जुनाच्या शेवटच्या शब्दांनीं एकलव्याचा राग अनावर झालेला असतो. त्याचे डोळे लाल होऊन विस्फारलेले असतात. गर्जना करीत— )

**एक०** : दिसेल तुला कोण आडवतें तें ! ( द्रोणांना उद्देशून तीव्र स्वरांत ) सांगा, गुरुजी; मी जर धनुर्विद्या शिकलों नसतों, तर हा जगांतला सर्वश्रेष्ठ धनुर्धर ठरला असता का ?

**द्रोण** : होय, वत्सा, ठरला असता !

**एक०** : आणि आपण आपलें वचन पाळलें, असेंहि ठरलें असतें ?

**द्रोण** : होय, वत्सा; पण —

**एक०** : ( चमकत्या नजरेनें निश्चयाच्या स्वरांत ) तर मग, गुरुजी, तुमचें वचन सत्य ठरेल; आणि मी याचें तोंड कायमचें बंद करून टाकीन. ( तो आवेगानें पुतळ्याजवळ जातो आणि आपला उजवा हात त्याच्या बैठकीवर ठेवून, डाव्या हातानें भात्यांतून एक अर्धचंद्राकार फळाचा बाण बाहेर काढतो. त्याची दृष्टि पुतळ्याच्या चेहेऱ्यावर खिळलेली असते. डाव्या हातानें अचूक वार करून, तो आपला उजवा आंगठा तोडतो. जखमेंतून वाहणाऱ्या रक्तप्रवाहाकडे लक्ष न देतां, आंगठ्याचा तुटलेला तुकडा उचलतो आणि द्रोणांजवळ येऊन, कांहींहि न बोलतां, तो आपल्या गुरूंच्या पायापाशीं ठेवतो. द्रोण व अर्जुन मंत्रमुग्ध झाल्याप्रमाणें उभे असतात. एकलव्यामागून जाणें, अगर त्याला प्रतिकार करणें त्यांच्याच्यानें होत नाहीं. )

**द्रोण** : ( एकलव्याचा विद्रूप हात पाहून ) कुमारा ! कुमारा ! ! काय केलेंस हें !

**एक०** : ( मोठ्या कष्टानें आंसू आवरीत, द्रोणांच्या पायाजवळील आपल्या आंगठ्याच्या तुटलेल्या तुकड्याकडे बोट दाखवून ) काय केलें ?








गुरुजी, आपणाबद्दल मला वाटणारें प्रेम आणि आदर यांचें अल्पसें चिन्ह म्हणून, ही गुरुदक्षिणा अर्पण करण्यापलीकडे मीं कांहींच केलें नाहीं. कांहीं वर्षांमागें मी आपल्या दर्शनाला आलों असतांना ( अर्जुनाकडे बोट दाखवून ) हा आर्य-कुमार म्हणाला होता कीं, 'तूं केवळ एक दरिद्री निषाद आहेस. आपल्या गुरूची दक्षिणा देण्याचें सामर्थ्यहि तुझ्या अंगीं नाहीं.' ( अर्जुनाला ) अजूनहि मी तोच आणि तसाच दरिद्री निषाद आहें. आणि माझी ही गुरुदक्षिणा कितीहि क्षुद्र असली, तरी माझ्या गुरूंच्या यशाला कलंक लावून त्यांची निंदा करणारें तुझें आणि तुझ्यासारख्या इतरांचींहि तोंडें बंद करण्याचें सामर्थ्य तिच्यांत आहे. माझ्या गुरूंचें वचन आतां खरें झालें आहे. आतां, तूं निःसंशय जगांतील सर्वश्रेष्ठ धनुर्धर ठरणार आहेस. ( आपला अंगुष्ठविहीन हात दाखवून ) पाहा, आतां माझी कितीहि इच्छा असली, तरी मला कधींहि शरसंधान करतां यावयाचें नाहीं.

[ यातना आणि अश्रु ताब्यांत ठेवण्यासाठीं त्याला अत्यंत परिश्रम पडत असतात. खालचा ओठ दांतांखालीं दाबून, तो आपल्या भावना दिसूं न देण्याचा प्रयत्न करीत असतो. द्रोणांच्या मनावर या घटनेचा परिणाम झालेला असून, त्यांचे ओठ थरथरत असतात, डोळे मिटलेले असतात. त्यांनीं आपला चेहरा दुसरीकडे वळविलेला असतो. अर्जुनावरहि या प्रसंगाचा पगडा बसला असून, दुःख आणि सहानुभूतीच्या स्वरांत तो एकलव्याशीं बोलण्याचा प्रयत्न करतो. ]

**अर्जुन** : या आपल्या उदात्त कृतीबद्दल तुला पश्चात्ताप तर होत नाहीं ?

**एक०** : पश्चात्ताप ! मला काय म्हणून पश्चाताप होईल ? माझ्या गुरुजींसाठीं मीं जें खरोखर करायला पाहिजे, त्या मानानें हें कांहींच नाहीं... [ त्याच्या मुद्रेवर एकाएकीं भीतीची कळा पसरते. ] —देवा ! देवा ! ! काय केलें मी हें ! माझ्या पाडसांचा कसा विसर पडला मला ! पश्चात्ताप ! खरेंच, माझ्या उरलेल्या आयुष्याच्या प्रत्येक क्षणाला, या माझ्या मूर्खपणाच्या कृतीचा मला पश्चात्तापच होत राहील. जेव्हां जेव्हां, एकाद्या हरिणाची करुण किंकाळी मला ऐकूं येईल, एकाद्या पाडसाचें मरणकाळचें विव्हळणें माझ्या कानीं पडेल, तेव्हां तेव्हां, माझ्याच मरणकाळच्या आक्रोशाचे ते केवळ पडसाद आहेत, असें वाटायला लागेल मला. ज्या ज्या वेळीं, छिन्नभिन्न आणि विद्रूप झालेलीं हरिणांचीं किंवा त्यांच्या पाडसांचीं कलेवरें माझ्या दृष्टीस पडतील, त्या त्या वेळीं, माझ्या शरीरांतून माझें काळीज खेचून, ओरबाडून काढल्याच्या घोर यातना माझ्या अनुभवाला येतील. खरोखरच माझ्या उरलेल्या आयुष्यांतील प्रत्येक क्षणाला, मीं हें मूर्खपणाचें कृत्य केलें, याबद्दल मला सारखा पश्चात्तापच होत राहील !

[ एकलव्य रक्तानें माखलेल्या आपल्या हातानें चेहरा झाकून घेऊन, हुंदके देवूं लागतो. अर्जुन त्याच्याजवळ येऊन, त्याच्या खांद्यावर हात ठेवून, त्याच्याशीं मृदु स्वरांत बोलण्याचा प्रयत्न करतो. ]

**अर्जुन** : मला खरोखरच वाईट वाटतें कीं, या साऱ्या प्रकाराला मी कारण झालों.

[ एकलव्य दृष्टि वर न करतांच अर्जुनाचा हात झिडकारतो आणि विनंतीच्या करुण स्वरांत त्याला उद्देशून बोलतो. ]

**एक०** : कृपा करून मला एकटा—अगदीं एकटा सोडाल का ?

[ द्रोण अर्जुनाला मागें खेंचतो आणि त्याला स्वतःच्या पुढें घालून, ढकलीत उजव्या बाजूच्या निष्क्रमणमार्गापलीकडे नेतो. तेथून त्याला दृष्टी-आड केल्यानंतर स्वतः एकलव्याजवळ फिरून परत येऊन—]

**द्रोण** : ( सहानुभूतीच्या अत्यंत करुण स्वरांत ) देव तुझें कल्याण करो, बाळ. मला निरोप दे.

**एक०** : ( रक्तानें माखलेला आपला चेहेरा वर उचलतो. अत्यंत कष्टी, करुण मुद्रेनें आणि हृदयद्रावक स्वरांत ) गुरुजी-! आपल्याला ठाऊक आहे; आपण दोघे एकमेकांचा निरोप कधींच घेऊं शकणार नाहीं !

[ द्रोण उजव्या बाजूनें निघून जातो. एकटाच राहिलेला एकलव्य असहायपणें सभोंवार दृष्टि फिरवतो. नंतर स्वतःच्या शरीराकडे खालपासून








वरपावेतों पाहातो. आंगठा नसलेल्या उजव्या हाताकडे त्याची नजर जातांच, त्याला हुंदका आवरत नाहीं. स्वाभाविकच त्याची नजर तेथून जमिनीवर पडलेल्या आंगठ्याच्या तुकड्याकडे जाते. भावनांचा वेग आवरून, तो निश्चयानें मुद्रा कठोर करतो. दांत घट्ट आवळून धनुष्याला बाण जोडतो–आणि त्याची दोरी ओढण्याचा प्रयत्न करतो. अपंग झालेल्या त्याच्या हातानें तें करतां येत नाहीं असें आढळतांच त्याच्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागतात. त्याच्या हातांतून धनुष्य गळून पडतें. डाव्या हातानें उजव्या खांद्यावरील भात्यांतील बाण काढून टाकून भाता रिता करतो. इतक्यांत अचानकपणें उजव्या बाजूनें कित्येक पाडसांच्या उच्च स्वरांतील किंकाळ्या ऐकूं येतात. ]

**एक०** : ( आपल्याला कांहींच करतां येत नाहीं, या जाणिवेनें भीति आणि निराशायुक्त स्वरांत ) अरे, देवा ! माझीं बिचारीं पाडसें–खास कांहीं तरी संकट ओढवलें त्यांच्यावर–आणि मी हा असा पुरता असहाय !—त्यांच्यासाठीं कांहींच करूं शकत नाहीं मी ! ( पाडसांच्या आरोळ्या सारख्या ऐकूं येत असतात. निघून जातांना द्रोण अखेरीस ज्या ठिकाणीं दिसेनासे झाले, त्या ठिकाणीं उजव्या बाजूला एकलव्याची नजर खिळलेली असते. ) गुरुजी ! ऐकला हा माझ्या पाडसांचा आक्रोश ? पाहिलें मीं काय केलें तें ! आपली दक्षिणा देण्यासाठीं, मला काय मोल द्यावें लागलें, याची कल्पना आली तुम्हांला ? माझ्या पाडसांचा मीं विश्वासघात केला. आतां त्यांच्या नजरेला मी नजर कशी भिडवूं ? नाहीं धीर व्हायचा मला तेवढा. ( कांहीं पाडसें धावत येतात. एकलव्याला पाहून जवळ जातात. त्यांचा स्पर्श टाळण्यासाठीं तो मागें सरकतो आणि त्यांची नजर चुकविण्यासाठीं चेहेरा लपवतो. ) नका–मला स्पर्श करूं नका. मी कलंकित झालों. शरीरानें, मनानें मलिन बनलों. तुम्हांला स्पर्श करायला मी पात्र नाहीं. तुम्हांला–माझ्याच पाडसांना–हें तोंड मी कसें दाखवूं ? तुम्हां सगळ्यांना मीं फशीं पाडलें. तुमचा घात केला मीं. आयुष्यांतला एकच क्षण मी तुम्हांला विसरलों. माझ्या मनांतून, माझ्या हृदयांतून–मीं तुम्हांला दूर केलें. आणि आपल्या गुरुवरच्या वेड्या प्रेमामुळें, जें देण्याचा मला अधिकार नव्हता, तें आपलें स्वतःचें समजून, मीं त्यांना देऊन टाकलें. तें माझें नव्हतें–तुमचें होतें–सदोदित तुमचेंच होतें. गुरुजी-बद्दलच्या वेड्या प्रेमाच्या त्या एका क्षणाला, मी तुम्हां सर्वांना विसरलों. धनुर्विद्या संपादन करण्यांतला माझा मूळ उद्देशच विसरलों. मी काय करतों आहें, हें मला कळलें नाहीं–मुळींच कळलें नाहीं,–अगदीं नाहीं. ( आतांपर्यंत त्याचे डोळे अश्रूंनीं भरलेले असल्यामुळें त्याची दृष्टि अंधुक झालेली असते, ती एकदम स्वच्छ होते; आणि तींत क्रोधाचा प्रादुर्भाव होऊं लागतो. द्रोण गेलेल्या बाजूकडे पुन्हां वळून ) पण त्यांना कळलें होतें–गुरुजींना कळलें होतें–त्यांना कळलें असलेंच पाहिजे. त्यांनीं मला आठव द्यायला पाहिजे होता. ( रागानें बेभान होऊन वळतो. द्रोणांच्या पुतळ्याजवळ येतो. त्याच्या शरीराचे सारे स्नायू ताठ होऊन मुठी वळलेल्या असतात. डोळ्यांतून संतापाच्या ज्वाला बाहेर पडत असल्याचा भास होतो. खाऊं कीं गिळूं, अशा आविर्भावानें पुतळ्यासमोर उभा राहून, गर्जना करीत बोलूं लागतो. ) आपल्याला हें असें करवलें तरी कसें, गुरुजी ! नुसत्या दृष्टिक्षेपानेंहि मला सूचना न देतां, आपण माझ्याकडे नुसते पाहात स्तब्ध कसे राहिलां ! माझें आपल्यावर इतकें प्रेम असतांना, आपल्या एका उर्मट शिष्याची स्वार्थी महत्त्वाकांक्षा पुरी करण्यासाठीं, त्याच्या मनाच्या स्वार्थी लहरीचें कौतुक करण्यासाठीं, जगांतल्या साऱ्या पाडसांच्या सुरक्षिततेचा, आपण मला होम कसा करूं दिला ! गुरुजी ! कसें करवलें हें आपल्याला ? धीर तरी कसा झाला ?

[ संतापानें आंधळा झाल्याप्रमाणें, पुतळ्यावर आघात करण्यासाठीं आपली मूठ उगारतो. पण पुतळ्याच्या चेहेऱ्यावर त्याला असें कांहीं तरी दिसतें कीं, त्यामुळें अगदीं ऐन वेळीं त्याचा हात जागच्याजागीं खिळतो. जणूं काय आपण कांहीं तरी भयंकर पाप करणार होतों, या जाणिवेनें त्याची मुद्रा भेसूर आणि भीतिग्रस्त दिसूं लागते. ]



अनुक्रमणिका






**एक०** : परमेश्वरा ! काय करतों आहें हें मी !

[ अंगावरून वारें गेल्याप्रमाणें त्याचे अवयव शिथिल होतात. पाय लटपटूं लागून, पुतळ्याच्या पायथ्याशीं तो कोसळून पडतो. पुतळ्याभोंवतीं प्रेमानें हात टाकून त्याच्या पायाजवळील खळग्यांत तो पुनः पुन्हां आपलें कपाळ घांसतो. भावनेचा आवेग अनावर होऊन एकाद्या लहान मुलाप्रमाणें हुंदके देऊन मुसमुसतो. ]—क्षमा करा, क्षमा करा, गुरुजी, क्षमा करा मला ! मी काय करीत होतों तें मला कळलें नाहीं...... तरी पण—गुरुजी, तुम्ही असें कसें केलें हो ! कसें करवलें हें तुम्हांला ? कसें करवलें ? कसें करवलें ?......

[ हळूहळू पडदा पडतो. ]

---



अनुक्रमणिका








# अनुवादकाचें निवेदन

**श्री. टी. पी. कैलासम्** यांच्या ' The Purpose ' या एकलव्याच्या कथेवरील नाटकाचा, 'प्रयोजन' नांवाचा हा अनुवाद केवळ योगायोगाची घटना आहे. श्री. बी. एस्. रामराव यांनीं 'महाराष्ट्र-साहित्य-परिषदे'च्या माधवराव पटवर्धन सभागृहांत, ता. १९ डिसेंबर १९५२ रोजीं, श्री. कैलासम् यांच्या त्या नाट्यकृतीचें वाचन केलें. सुदैवानें मी त्या कार्यक्रमाला उपस्थित होतों. वाचन अत्यंत परिणामकारक झालें. तंत्र आणि आशय या दोन्ही दृष्टींनीं मला श्री. कैलासम् यांची ती कृति अत्यंत संस्मरणीय वाटली.

त्यानंतर कांहीं दिवस गेले. एके दिवशीं 'नवभारत' मासिकाचे कार्यकारी संपादक प्रा. वि. म. बेडेकर मजकडे आले. 'नवभारत' मासिकासाठीं मीं कांहीं तरी लिहावें, असा मला आग्रह करण्यासाठीं ते असे मधूनमधून मजकडे येत असतात आणि लवकरच 'कांहीं तरी' लिहिण्याचें आश्वासन घेऊन परत जात असतात परंतु या वेळीं नुकतेंच ' The Purpose 'चें वाचन ऐकलें असल्यामुळें, त्याचा मराठींत अनुवाद करावा, अशी माझ्या मनांत अस्फुट आकांक्षा होती. म्हणून नेहमींप्रमाणें त्यांना औपचारिक आश्वासन न देतां, 'नवभारत'मधून त्या नाटकाचा अनुवाद प्रसिद्ध करणें, कितपत शक्य आणि उचित होईल, अशी मीं पृच्छा केली. त्यांना ती कल्पना पसंत पडली. पुढें 'नवभारत'च्या इतर अधिकारी मंडळींशीं चर्चा करून त्यांनीं त्याबद्दलची योजना पक्की केली. मीं आपला अनुवाद पुरा केला. आज तो रसग्रहणार्थ आपल्यापुढें सादर होत आहे.

' The Purpose 'चे लेखक कै. श्री. टी. पी. कैलासम् यांचा प्रत्यक्ष परिचय होण्याचें भाग्य मला लाभलें होतें. सुमारें वीसएक वर्षांपूर्वी, माझे मित्र श्री. वि. स. सुखटणकर—' सह्याद्रीचे पायथ्याशीं ' या लघुकथासंग्रहाचे कर्ते-यांच्या घरीं मुंबई येथें श्री. कैलासम् यांच्या भेटीचा लाभ तीन चार वेळां मला झाला. त्यांच्या तोंडून त्यांच्या ' कीचक ' नाटकांतील जो कांहीं भाग ऐकावयाला मिळाला, त्यावरून श्री. कैलासम् यांच्या प्रतिभेच्या प्रभावाचा प्रत्यय मला आला; पण तेव्हां तिनें मला लुब्ध केलें, असें म्हणणें अतिशयोक्त होईल.

' नाट्यमन्वन्तरा 'ची संस्थापना आणि विकास, यांसाठीं आमची तेव्हां धडपड चालली होती व त्या निमित्तानें भारताच्या वेगवेगळ्या प्रांतांतील, नाट्यविषयक कामगिरी करणाऱ्या ज्या कुणाशीं परिचय करून घेण्याची संधि मिळेल, ती घ्याव-याला मी चुकत नसें. या दृष्टीनें श्री. कैलासम् आणि प्रा. जहागीरदार—आद्य रंगाचार्य—या दोन कन्नड नाटककार आणि नाट्यनिर्मात्यांशीं मीं तेव्हां बुद्धिपुरस्सर परिचय करून घेतला. त्यांच्याशीं नाट्यविषयक चर्चा केल्या. त्या चर्चांत श्री. कैलासम् यांच्या प्रभावी व्यक्तित्वाचा माझ्यावर जितका परिणाम झाला, तितका त्यांच्या विचारां-चा आणि विवेचनाचा झाला नाहीं. शॉ व इब्सेन यांच्या कला आणि कार्याबद्दलचीं त्यांचीं कांहीं मतें आणि विचार तर मला अघटितच ( fantastic ) वाटले. त्यांच्या मानानें प्रा. जहागिरदार हे माझ्या विचारांशीं मला अधिक जवळचे वाटले व त्यामुळें त्यांच्याशीं मी जास्त परिचय ठेवूं शकलों.

परंतु परवां श्री. रामराव यांच्या तोंडून ' The Purpose ' चें श्रवण केल्यावर मात्र श्री. कैलासम् यांच्या दीप्तिमान् प्रतिभेच्या सामर्थ्याचा वेगळाच साक्षात्कार मला मिळाला. त्यानें माझे अंतश्चक्षू दिपले. त्यांची ही कृति, आपल्या अल्प-

शक्तीप्रमाणें, मराठींत अनुवादित करावी, अशी इच्छा माझ्या मनांत जागृत झाली; ' नवभारत '-च्या सहकार्यामुळें तिला आलेलें हें मूर्त स्वरूप आज आपणांपुढें आहे.

प्रस्तुत अनुवाद शक्य तितका मुळाला धरून करण्याचा मीं कसोशीनें प्रयत्न केला आहे. मुळांतील वाक्यरचनेची पद्धति, तसेंच शब्दप्रयोगांतील नाद, आरोहावरोह, लय यांचें प्रतिबिंब अनुवादांत दिसावें, यासाठीं करतां येतील तितके प्रामाणिक प्रयत्न मीं केले आहेत. त्यामुळें क्वचित् कोणा मराठी वाचकाला एकाद्या ठिकाणीं खटकल्यासारखेंहि वाटण्याचा संभव आहे. विशेषनामांचीं संबोधनें, ' ताताजी ', ' कार्मी ' इ. शब्दप्रयोग, मुळांतील आहेत. ' कार्मी ' हा शब्द मला स्वतःला चुकीचा वाटतो; पण श्री कैलासम् यांनीं त्याचा आग्रहपूर्वक प्रयोग केला असल्याचें स्पष्ट दिसत असल्यामुळें, त्याला हात लावण्याचें औद्धत्य मीं दर्शविलें नाहीं. रंगसूचनांत भीष्म आणि द्रोण यांचा उल्लेख कांहीं ठिकाणीं एकवचनी तर कांहीं ठिकाणीं बहुवचनी आढळेल. ती नजरचूक नव्हे.

प्रस्तुत अनुवाद आहे त्या स्वरूपांत सिद्ध होण्यासाठीं, ज्यांचें ज्यांचें मला साहाय्य लाभलें, त्या सर्वांचाच मी अंतःकरणपूर्वक आभारी आहें. तरी पण, श्री. बी. एस्. रामराव यांनीं ' The Purpose 'चें परिणामकारक वाचन ऐकविलें; श्री. विठ्ठलराव दीक्षित यांनीं अनुवादासाठीं नाटकाची इंग्रजी प्रत उपलब्ध करून दिली; श्री. कैलासम् यांच्या सुपुत्री सौ. लक्ष्मी गणनाथन् यांनीं आपल्या पित्याच्या कृतीचा अनुवाद करण्यास अनुज्ञा दिली; प्रा. द. रा. बेंद्रे यांनीं अनुवादाचें वाचन ऐकून प्रस्तावना लिहिण्याचें मान्य केलें; प्रा. वि. म. बेडेकर यांनीं त्याला ' प्रयोजन ' हें नांव दिलें; चि. प्रमोद यानें अनुवादाची शुद्ध व सुवाच्य मुद्रणप्रत करून दिली; प्रा. मंगरूळकर व प्रा सौ. मुक्ताबाई दीक्षित यांनीं मुद्रणप्रत साक्षेपी दृष्टीनें वाचून कांहीं शब्दप्रयोगांत बदल सुचविले; आचार्य भागवत यांनीं ' आंतरभारती 'च्या वतीनें या अनुवादाच्या वाचनाचा कार्यक्रम केला—म्हणून या सर्वांच्या त्या त्या मदतीबद्दल नामोल्लेखपूर्वक कृतज्ञता व्यक्त करणें, हें माझें कर्तव्य होय.

मनीषा, पुणें ४<br>ता. १५ ऑगस्ट १९५३ } के. नारायण काळे








‘ नवभारत ’ लेख-सूचि

वर्ष ६ वें : ऑक्टोबर १९५२ ते सप्टेंबर १९५३










## नवभारत










## लेख-सूचि ( ऑक्टोबर १९५२ ते सप्टेंबर १९५३ )














## लेख-सूचि ( ऑक्टोबर १९६२ ते सप्टेंबर १९६३ )









## नवभारत










# लेख-सूचि (ऑक्टोबर १९५२ ते सप्टेंबर १९५३)









# 'नवभारत' लेखक-सूचि

## वर्ष ६ वें : ऑक्टोबर १९६२ ते सप्टेंबर १९६३

[ पहिला आंकडा अंकाचा अनुक्रम; दुसरा आंकडा पानांचा ]

# लेखक-सूचि ( ऑक्टोबर १९५२ ते सप्टेंबर १९५३ )

———

Regd. No. B. 5177








